मुंबई विद्याखात्यानें मंजूर केलेली

# मराठी कादंबरीकथा

अथवा

## बाणभट्टकृत कादंबरीचें सुबोध कथानक

**नीळकंठ शंकर नवरे,** बी. ए. (ऑनर्स), बी. टी.,
संस्कृताध्यापक, नॉर्थकोट हायस्कूल, सोलापूर
संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें, संस्कृत कादंबरीकथा, मराठी रघुवंशकथा
इत्यादि पुस्तकांचे कर्ते

सुधारून वाढविलेली सचित्र
द्वितीयावृत्ति

मूल्य १० आणे १९३४

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

कादंबरीरसभरांत बुडून राही।
हा लोक त्यास न रुचे मग अन्य कांहीं ॥
—पारखीशास्त्री.

कादंबरी म्हणजे कल्पित कथा हें कोणास सांगावयास नको. हा शब्द आपल्याकडे बाणभट्टाची 'कादंबरी' या अद्‌भुत कथेवरून रूढ झाला. विशेषनामांचें सामान्यनाम झाल्याचें हें एक उत्तम उदाहरण होय. हायस्कुलांतल्या विद्यार्थ्यांना 'हा उतारा कादंबरींतला आहे' असें सांगतांना 'कादंबरी' हें त्या ग्रंथांतील एका पात्राचें—नायिकेचें—नाव आहे असें बजावून सांगावें लागतें आणि तें ऐकून विद्यार्थ्यांस अत्यंत विस्मय वाटतो.

बाणाच्या कादंबरीची योग्यता, उत्कृष्ट काव्यग्रंथ व पहिल्या प्रतीची 'कादंबरी', या दोन्ही दृष्टींनीं जगांतील वाङ्मयांत फार मोठी आहे. हिच्यांतील अनेक प्रसंगांचीं वर्णनें फारच बहारीचीं व मनोवेधक आहेत. लहान लहान वाक्यात्मक वर्णनेंहि विपुल असून या वर्णनशैलीच्या बाबतींत बाणाचा हात धरणारा क्वचितच भेटेल. येथें तुम्हांला लांबलचक समासांचे कांटे रुतणार नाहींत एवढेंच नव्हे, पण ते दृष्टीलाहि पडणार नाहींत. जागजागीं सुगंधि पुष्पांचे ताटवे मात्र तुमच्या दृष्टीला मोहून टाकतील. कादंबरी ही उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, श्लेष इत्यादि अलंकारांचें भांडार असून शृंगार, करुण, अद्भुत इत्यादि रसांचा महासागरच होय. बाण एकदां वर्णन करूं लागला कीं, वाचकावर इतका भडिमार करतो कीं, त्यास पुरे पुरेसें होऊन 'बस करा' हे त्याच्या तोंडांतून उद्गार निघत असतांना, काय हा भाषाविलास! केवढें हें भाषाप्रभुत्व व भाषावैभव! हा काय सरस्वतीचा अवतार आहे! असेहि कौतुकोद्गार एकसमया-

वच्छेदेंकरून त्याच्या मुखावाटे आल्याविना राहात नाहींत. पंच-पक्वान्नाचे भोजनसमयीं हें खाऊं का तें खाऊं अशी जेवणाराची त्रेधा नव्हे 'पंचधा' उडावी, त्याप्रमाणें बाणभट्टाचा 'आग्रह' पाहून कैक वेळां 'मिठी' बसते, पण एकीकडे त्याच्या कौशल्याची तारीफ करावीशीहि वाटते. आकाशांत भरारी मारणारीं बाणाचीं पात्रें पाहिलीं म्हणजे भू व स्वर्ग यांत मुळींच अंतर नसून तें एकच अवाढव्य साम्राज्य आहे असा आपणांस भास होतो व त्यांच्या सहवासांत यथेच्छ विहार करावयास मिळाल्यानें अनिर्वचनीय आनंद होतो. या काव्यानंदाचा रसास्वाद प्रस्तुत ग्रंथांत थोडाबहुत चाखावयास मिळेल. तथापि ज्यांना तो मनसोक्त लुटावयाचा असेल त्यांनीं मुळाकडेच गेलें पाहिजे.

गद्य काव्य या दृष्टीनें कादंबरीची सर्वमान्यता कबूल केली तरी कादंबरीचा नामोच्चार होतांच लांबलांब वर्णनें व लांबच लांब समासांच्या मालगाड्या डोळ्यांसमोर उभ्या राहातात. शाळेंतील मुलांना तर कादंबरींतील उतारा पाहिल्याबरोबर धडकी भरते. 'To go through Bāṇa is to go through a forest full of thorns' अशा प्रकारें बाणाच्या ग्रंथांना पाश्चात्य संस्कृतभाषाकोविदांनीं दुर्बोध समासांच्या कंटकमय जंगलाची उपमा दिली आहे. १९१२ सालीं पुण्याच्या वसंतव्याख्यानमालेंत कै० प्रो० महादेव मल्हार जोशी यांचें बाणभट्ट या विषयावर उत्कृष्ट व्याख्यान झालें होतें. त्याप्रसंगीं श्री. नरसोपंत केळकर यांनीं कादंबरीविषयीं बोलतांना असें सांगितलें होतें कीं, 'राजाराम कॉलेजांतील आमच्या वेळचे प्रोफेसर ( कै० शिवराम बापूजी परांजपे ) कादंबरी शिकवितांना, समासांच्या बोगद्यांत ' येथें कंदील लावा, ' ' येथें कंदील लावा ' असें म्हणून आम्हांस पेनसिलीच्या खुणा करण्यास सांगत; प्रोफेसर जोशी यांस माझी अशी सूचना आहे कीं, त्यांनीं समासांची छाटाछाट करून

कादंबरीची एक सुटसुटीत आवृत्ति काढावी.'

समासप्राचुर्य व समासांचीं कंटाळवाणी लांबण हा तत्कालीन भाषापद्धतीचा 'विशेष' म्हणून सोडून दिला तरी 'गोष्टींत गोष्ट' घालण्याच्या संस्कृत गद्यलेखकांच्या सार्वत्रिक पद्धतीचाहि कादंबरींत बाणानें अवलंब केल्यामुळें फारच थोड्या साक्षेपी वाचकांच्या हातांत तिचें कथासूत्र संगतवार लागतें. एका मोठ्या पातेल्यांत त्यापेक्षां लहान पातेलें व त्यांत तिसरें पातेलें किंवा गणिताच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे एका कंसांत दुसरा कंस असा येथें प्रकार आढळतो. यामुळें रिव्हर्सिंग स्टेशनवर गाडी मागेंपुढें जावी त्याप्रमाणेंच कादम्बरी वाचतांना वाचकाची थोडीफार अवस्था होऊन जाते असा अनुभव आहे.

विदिशा देशाच्या शूद्रक राजाकडे एका चांडालकन्येनें एक राघू आणला व तो आपलें वृत्त सांगूं लागला. जाबालि महर्षि आपल्या आश्रमांतील मुनिजनांस या शुकबालाचा पूर्वजन्मींचा वृत्तान्त कथन करूं लागले. त्यांतून तारापीडाची कथा उद्भवली. तारापीडाचा पुत्र चंद्रापीड हा एकदां मृगया करीत घोड्यावरून फिरत असतां एका शिवमंदिरांत त्यास महाश्वेता भेटली. झालें! ती आपली चरित्रकथा निवेदन करूं लागली! आतां काय करावें? तो पोपट कोठल्याकोठेंच गेला! अर्धाअधिक प्रवास करून श्रमलेल्या वाचकास त्या 'कादंबरी'चा पत्ताच लागत नाहीं, मग दर्शनलाभ कोठला? नवोपनीत बटु ज्याप्रमाणें जानव्याच्या गुंतागुंतींत गोंधळून जातो, त्याप्रमाणें नूतन वाचकहि या विलक्षण कथासूत्राच्या गुंतागुंतींत दिङ्मूढ होऊन जातो.

प्रस्तुत पुस्तकांत प्रारंभींच कादंबरीची ओळख करून देऊन शूद्रकाची 'सलामी' शेवटीं घडविली आहे. तीनहि जन्मांतील पात्रांच्या कथा योग्य अनुक्रमानें एकापुढें एक देऊन थोडक्यांत,

सोप्या भाषेत व रसहानि होऊं न देतां हें रम्य कथानक सुसंबद्ध व विशद रीतीनें कथन केलें आहे. या पद्धतीनें गोष्ट लिहून काढावी असें फार दिवस मनांत होतें. हींत मुळांतील मोहकता व मुळांतील माधुरी यांचा थोडासा 'मासला' वाचकांस चाखावयास मिळेल.

कै० परशुरामतात्या व पारखीशास्त्री यांनीं मराठी भाषेत कादंबरीचा परामर्ष घेऊन मराठी वाचकांना मूळच्या स्वरूपांत या अद्भुतरम्य ( Romantic ) कथेचा उत्कृष्ट परिचय करून दिला आहे. पण त्यांच्या कृति आतां दुर्मिळ झाल्या असून त्यांची भाषासरणी कांहींशी जुन्या वळणाची भासते. शिवाय भाषांतर वाचण्याकडे फारच थोड्या वाचकांची प्रवृत्ति होते आणि भाषांतर वाचून मूळ कृतीची आवड उत्पन्न होत असतेच असें नाहीं. उत्कृष्ट वाङ्मयाची वाचकवर्गांत अभिरुचि निर्माण करण्यास प्रस्तुत पुस्तकासारखे आटोपशीर ग्रंथ मराठींत अवश्य व्हावयास पाहिजेत अशी लेखकाची नम्र समजूत आहे. 'संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें' या माझ्या पहिल्या पुस्तकाच्या धर्तीवरच या पुस्तकाचें सामान्यतः स्वरूप असून मुलामुलींच्या हातीं देण्याला सर्वथैव योग्य असेच त्याचें धोरण ठेविलें आहे. हा मेवा त्यांस रुचकर व हितकर वाटेल अशी अपेक्षा आहे.

या पुस्तकाच्या वाचनानें शाळाकॉलेजांतील विद्यार्थ्यांस कादंबरींतील उतारे लीलेनें लावतां येतील असा भरंवसा वाटतो. परीक्षार्थी विद्यार्थ्यांप्रमाणें इतर सामान्य कथाप्रिय व कादंबरीचें वेड असणाऱ्या वाचकांनाहि ही वानगी बोधप्रद व मनोरंजक वाटल्यावांचून राहाणार नाहीं.

कादंबरीकथेवर चित्रांचा साज चढवावा असा मनोदय होता, पण अनेक कारणांनीं तो सिद्धीस गेला नाहीं. पुढें पाहूं. प्रकृत पुस्तक लिहितांना येथील ह. दे. हायस्कूलचे हेडमास्तर, प्रो. गो. प. पट-

वर्धन व गु. डॉ. वा. गो. परांजपे, यांनीं आत्मीय भावनेनें, आस्थेनें व परोपरीनें मला साह्य केल्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. तसच परिशिष्टांतील अमोल सूक्तिरत्नांचा संग्रह करतांना माझे स्नेही रा. के. ना. वाटवे, एम्. ए. यांची बहुमोल मदत झाली, त्याबद्दल त्यांचेहि आभार मानणें अवश्य होय.

सोलापूर,
महाशिवरात्र शके १८५०
सन १९२९

नीळकंठ शंकर नवरे

---

## द्वितीयावृत्तीचा विशेष

ह्या आवृत्तींत भाषेच्या दृष्टीनें सफाईचा हात फिरविला असून पुष्कळ ठिकाणीं अधिक मजकूर घातला आहे. पात्रांच्या तीनहि जन्मांतील कथा विशद रीतीनें कळण्यासाठीं पुस्तकाचे तीन विभाग कल्पिले आहेत. कथेच्या ओघांत येणारीं मूलग्रंथांतील संस्कृत सुभाषितें त्या त्या स्थळीं पादटीपांतून दिलीं असून पुस्तकाच्या शेवटीं तीं पृष्ठांकासह एकत्रित केलीं आहेत. तसेंच आमच्या शाळेंतील कलाभिज्ञ शिक्षक रा. श्रीराम कृष्ण जोशी यांच्याकडून मुद्दाम काढवून घेतलेल्या कांहीं रेखाचित्रांचा समावेश या ग्रंथांत केला आहे; त्यायोगें कादंबरीकथेच्या अंतर्बाह्य सौंदर्यांत भर पडेल असा मला पूर्ण भरंवसा वाटतो. थोडक्यांत व ठराविक शब्दांत सांगावयाचें म्हणजे ही आवृत्ति ‘ सुधारून वाढविलेली ’ आहे. अर्थात् सुधारणा करितांना मूळ संस्कृताला तर धरून असावयाचें, मराठी पण होईल तितकें गोड करावयाचें व पदरचें तिखटमीठ तर त्यांत मुळींच घालावयाचें नाहीं हा स्वतःचा दंडक मीं पूर्ववत् कसोशीनें पाळला आहे. कांहीं अधिकार गाजविला असेल तर ‘ गाळण्याचा,’ नवीन ‘ घालण्याचा’ नाहीं. कादंबरीकथेचीं भावंडें—संस्कृत कवींचीं नाट्यकथानकें व रघुवंशकथा—ह्यांमध्येंहि मीं हेंच धोरण स्वीकारलें असून अनेक मर्मज्ञ विद्वानांना तें पसंत पडल्याचें त्यांनीं आपल्या अभिप्रायांत नमूद केलें आहे.

प्रस्तुत पुस्तकाचें वैशिष्ट्य म्हणजे बाणभट्टाच्या संस्कृत कादंबरीचा संक्षिप्त मराठी अवतार एवढेंच नसून तिचें रचनान्तर अथवा वेगळ्या पद्धतीनें प्रकरणशः मांडणी हें होय. विद्वद्वर्य प्रो. पांडुरंग वामन काणे यांनीं आपल्या कादंबरीच्या आवृत्तींत मुळाबरहुकूम

कथेचा इंग्रजींत सारांश दिला आहे; पण कादंबरीचें कथानक सांगायाचें झालें तर तें प्रस्तुत पुस्तकांत अनुसरलेल्या तऱ्हेनें सांगावयास हवें, असे श्री. काणे यांनीं प्रस्तुत लेखकाजवळ उद्गार काढले आहेत. श्री. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं ही कादंबरीकथा सहजगत्या एका मित्राचे घरीं वाचली, तेव्हां त्यांस अत्यंत आनंद झाला. " कॉलेजमध्यें असतांना कादंबरीचीं कांहीं पृष्ठें आपण वाचलीं होतीं, पण तेव्हांपासून आपल्या मनांत कथानकासंबंधीं जो गोंधळ होता तो या पुस्तकानें नाहींसा केला " असे त्या मित्रापाशीं उद्गार काढून " फार सुंदर आहे. An excellent text book for Marathi " असा त्यांनीं आपला स्वयंस्फूर्त अभिप्राय त्या प्रतीवर लिहून ठेविला आणि तो मला यदृच्छेनें पाहावयास मिळाला.

शिरगांवच्या श्री. अं. स. मोगरे या नांवाच्या एका वृद्ध व बहुश्रुत गृहस्थास ही कादंबरीकथा इतकी आवडली कीं, त्यांनीं तिचें प्रकरणवार पद्यात्मक भाषांतर करून तें मजकडे पाठविलें आहे.

संस्कृत ललितवाङ्मयामध्यें कादंबरी हा ग्रंथ नाटकांच्या मानानें समजण्यास अत्यंत दुर्बोध आहे. गीर्वाण भाषेंत ज्यांची चांगली गति आहे अशांशिवाय इतर वाचक तो मुळांतून वाचण्याचा कंटाळाच करतात व केवळ अभ्यासासाठीं म्हणून तो वाचावयाचा झाला तरी नियत भागापलीकडे ( म्हणजे सरासरी ६०–७० पृष्ठें ) ते सहसा जात नाहींत !

सारांश, संविधानकाची गुंतागुंत व भाषाकाठिन्य ह्या उभयविध अडचणीनें युक्त अशा या ग्रंथाचा विद्यार्थ्यांना व त्याचप्रमाणें इतरांनाहि परिचय करून घेण्याचें साधन प्रस्तुत पुस्तकानें निर्माण करून दिलें आहे. या दृष्टीनें पाहातां केवळ बालवाङ्मयांतच या पुस्तकानें भर टाकली नसून प्रौढ विद्यार्थी, शिक्षक व संस्कृत वाङ्मयाविषयीं

कौतुक व प्रेम असणाऱ्या निवळ मराठी वाचकांनाहि हें पुस्तक उपयुक्त झालें आहे, हें लिहिण्यास मला समाधान वाटतें.

संस्कृतचा अभ्यास करणारास साहाय्यभूत म्हणून व मराठी वाङ्मय म्हणूनहि या पुस्तकाचा उपयोग होत असल्यामुळें कित्येक माध्यमिक शाळांनीं मराठी वाचन पुस्तक म्हणून तें अभ्यासक्रमांत समाविष्ट केलें आहे.

चित्रकार श्री. श्री. कृ. जोशी यांनीं कादंबरीस अलंकृत करून मला उपकृत केलें आहे. तसेंच श्री. के. ल. ओगले, बी. ए., ( डोंबिवली ), श्री. रा. दा. देसाई, बी. ए., ( पुणें ) व श्री. स. के. श्रोत्रिय (सोलापूर) यांनीं ही आवृत्ति शक्य तितकी निर्दोष व सर्वांगसुंदर करण्याच्या कामीं स्नेहभावानें साहाय्य केल्याबद्दल मला त्यांचे अन्तःकरणपूर्वक आभार मानल्याशिवाय राहवत नाहीं.

१-१-१९३४ नीळकंठ शंकर नवरे.



# अनुक्रमणिका



## पात्रें

**कादंबरी**— नायिका, चित्ररथ गंधर्वाची कन्या
**चंद्रापीड**— नायक, उज्जयिनीचा राजपुत्र
**महाश्वेता**— उपनायिका, कादंबरीची सखी
**पुंडरीक**— उपनायक, श्वेतकेतु ऋषींचा पुत्र
**कपिंजल**— पुंडरीकाचा मित्र, ऋषिकुमार
**तारापीड**— उज्जयिनीचा राजा, चंद्रापीडाचा पिता
**शुकनास**— तारापीडाचा प्रधान
**विलासवती**— तारापीडाची पत्नी
**मनोरमा**— शुकनासाची पत्नी
**वैशंपायन**— शुकनासाचा पुत्र, चंद्रापीडाचा स्नेही, ( पुंडरीकाचा दुसरा जन्म )
**इंद्रायुध**— चंद्रापीडाचा अश्व, ( कपिंजलाचा दुसरा जन्म )
**पत्रलेखा**— चंद्रापीडाची दासी, ( रोहिणीचा अवतार )
**मदलेखा**— कादंबरीची दासी
**तरलिका**— महाश्वेतेची दासी
**केयूरक**— कादंबरीचा वीणावाहक
**मेघनाद**— तारापीडाचा सेनापति
**शुक**— ( वैशंपायनाचा अवतार )
**जाबालि**— एक महर्षि
**हारीत**— जाबालींचा पुत्र
**चांडालकन्या**— ( पुंडरीकाची माता लक्ष्मी, हिनें घेतलेलें रूप )
**शूद्रक**— उज्जयिनीचा राजा, ( चंद्रापीडाचा दुसरा जन्म )



## पुनर्जन्म

| चंद्र | पुंडरीक | कपिंजल | रोहिणी |
|---|---|---|---|
| \| | \| | \| | \| |
| चंद्रापीड | वैशंपायन | इंद्रायुध | पत्रलेखा |
| \| | \| | | |
| शूद्रक. | शुक | | |

# मराठी कादंबरीकथा

## भाग पहिला

### प्रकरण १ लें

### दोन मैत्रिणी

हिमालय पर्वत म्हणजे पृथ्वीवरील सर्व पर्वतांचा राजा होय. त्याचीं शिखरें अखंड हिमाच्छादित असतात. त्यांपैकीं कैलासनामक एक अत्यंत पवित्र व अत्युच्च शिखर आहे. शैलराजाचे जामात भगवान् शंकर व कन्या पार्वती याच ठिकाणीं वास करितात. कैलासराणा अथवा कैलासनाथ अशा संज्ञा शंकरास प्राप्त होण्याचें कारण हेंच होय. शंकराचा स्नेही व यक्षांचा स्वामी कुबेरहि पण येथेंच राहतो.

कैलासाच्या उतरणीवरील प्रदेशांत पुरातनकाळीं चैत्ररथ म्हणून एक गहन अरण्य होतें. देवांचा गवई चित्ररथ गंधर्व याच्याच नांवावरून या अरण्यास चैत्ररथ असें म्हणत. कारण त्यानें या वनाच्या मध्यभागीं अच्छोद नांवाचें सरोवर निर्माण केलें होतें. त्याचें उदक स्फटिकवत् स्वच्छ असल्यानें 'अच्छोद'' हें अभिधान यथार्थ होतें. चित्ररथानें अच्छोदाच्या उत्तर तटावर शिवाचें सुंदर व भव्य देवालय बांधिलें. प्रातःकाळीं या रम्य सरोवरांत स्नान करून महादेवाची पूजाअर्चा करण्याचा गंधर्वांचा नित्य परिपाठ असे.

गंधर्वांचीं एकंदर चौदा कुळें होतीं. त्यांपैकीं एक चंद्रकिरणांपासून, दुसरें अमृतापासून, तिसरें अग्नीपासून, व चवथें वायूपासून उत्पन्न झालें होतें; व बाकीचीं अशाच प्रकारच्या निरनिराळ्या उज्ज्वल वस्तूंपासून निर्माण झालीं होतीं.

चित्ररथ गंधर्वाचें कुळ प्रत्यक्ष चंद्रापासून झालें असल्यामुळें तें या सर्वांत प्रमुख व श्रेष्ठ होतें. चित्ररथाचें देवाधिदेव इंद्राशीं परम सख्य होतें. त्याला कादंबरी नांवाची कन्या होती. हीच आपल्या कथेची नायिका होय. तिचें लावण्य केवळ अप्रतिम होतें. चित्ररथाचा चुलत भाऊ हंस म्हणून होता. त्यालाहि एक मुलगी होती. तिचा वर्ण हिमाचलावरील बर्फाप्रमाणें श्वेत असल्यानें तिचें नांव महाश्वेता असें ठेविलें होतें.

कादंबरी व महाश्वेता यांनीं एका पात्रांत भोजन करावें, एका जागीं खेळावें व एकाच ठिकाणीं नृत्यगीतांचा अभ्यास करावा, ह्यामुळें त्या दोघींची विशेष गट्टी जमली; आणि उत्तरोत्तर ती शुक्लेंदुवत् वृद्धिंगत होऊं लागली. ती इतकी कीं, एकमेकीला एकमेकीशिवाय क्षणभरहि करमेनासें झालें.

## प्रकरण २ रें

# माळेची अदलाबदल

महाश्वेता व तिची आई गौरी दररोज भल्या पहांटेस उठून अच्छोद सरोवरावर अंग धुण्यास जात असत. एकदां वसंत ऋतूच्या दिवसांत त्या मायलेकी सरोवराच्या जवळ येत असतां त्यांना प्रातः- काळच्या मंद व शीतल वायूच्या झुळुकेबरोबर अत्यंत मनोहर व अपूर्व सुवास आला. अशा प्रकारचा सुवास त्यांस पूर्वीं कधींच आला नव्हता. हा कोठून आला म्हणून मोठें कौतुक वाटून महा- श्वेता आजूबाजूस पाहूं लागली. तिच्यानें कोठलें राहवतें ? गौरी मागेंच राहिली व महाश्वेता केवळ जिज्ञासा तृप्त करण्याकरितां सुगंधाचा माग काढीत काढीत भ्रमराप्रमाणें इतस्ततः भटकूं लागली. इतक्यांत एक दिव्याकृति ऋषिकुमार ध्यानस्थ बसलेला तिच्या दृष्टीस पडला. हा मूर्तिमंत वसंतच आहे असें तिला वाटलें. त्याच्या काना- वर एक टवटवींत पुष्पमंजरी होती. तिचाच आपणास हा परिमल आला अशी तिची आतां पक्की खात्री झाली. ती तेजःपुंज मूर्ति पाहून तिच्या मनांत आलें कीं, 'काय हें विधात्याचें कौशल्य ! याच्या सौंदर्यास त्रैलोक्यांतहि जोड मिळावयाची नाहीं. हा मदनासहि मागें सारील. हा प्रत्यक्ष धर्मच आहे कीं सरस्वतीचा विलास आहे ?'

महाश्वेता क्षणभर तेथेंच स्तिमित उभी राहिली व मग ऋषीस वंदन केल्याखेरीज जाणें योग्य नाहीं असें वाटून ती त्याच्या संनिध बसलेल्या दुसऱ्या तापसकुमाराजवळ गेली. त्यास तिनें भक्तिपुरःसर वंदन केलें, आणि बोलूं का नको, विचारूं का नको, अशा लज्जा- नम्रस्वरानें ती म्हणाली,

'महाराज, या आपल्या मित्राचें नांव काय ! कोणत्या ऋषीचा हा पुत्र आहे ? याच्या कानावरील फुलें कसलीं आहेत ? त्यांचा काय

घमघमाट सुटला आहे!' त्यानें स्मितपूर्वक उत्तर दिलें, "हें तुला विचारून काय करावयाचें आहे? तथापि तुला विशेषच कुतूहल वाटत असेल तर सांगतों. ऐक. श्वेतकेतू ऋषीचें नांव तूं ऐकलें असशील. तो एकदां आकाशगंगेंत कमलें तोडीत असतां देवी लक्ष्मीनें त्यास पाहिलें. तेव्हां तिला वाटलें कीं, आपणांस या ऋषी-सारखाच तेजस्वी पुत्र असावा. ज्या शुभ्र कमलावर ती अधिष्ठित झाली होती त्यांतूनच एक कुमार तत्क्षणींच उत्पन्न झाला. मग ऋषि-वर्यांस तो अर्पण करून लक्ष्मीनें म्हटलें, 'भगवन्, हा घ्या आपला बालक'.

"श्वेतकेतूनें त्याचे जातकर्मादि संस्कार केले व पांढऱ्या कमला-पासून त्याची उत्पत्ति झाली असल्यामुळें पुंडरीक असें त्याचें नांव ठेविलें. पुढें पांचव्या वर्षीं त्याचें उपनयन करून त्यास वेदविद्या शिकविली. तोच हा माझा मित्र पुंडरीक. आज आम्ही दोघे महे-श्वराच्या दर्शनास इकडे येत असतां इंद्राच्या नंदनवनांत जरासे थांबलों होतों. त्या वेळीं नंदनवनदेवतेनें पारिजातकाची पुष्पमंजरी, हा नको नको म्हणत असतांहि, याच्या कानावर ठेवून म्हटलें, 'या स्थानीं ही कशी शोभते आहे पहा! म्हणून कृपा करून या मंजिरीचा स्वीकार करावा, म्हणजे पारिजातकाचें जीवित सफल होईल.' मुली, तुझें चित्त आकर्षण करणारी हीच ती मंजरी. हिचाच सुवास आस-मंतांत दरवळून राहिला आहे."

याप्रमाणे कपिंजल हकीकत सांगत असतां पुंडरीकानें नेत्र उघ-डिले व "तुला हिचा वास फारच आवडत असेल तर ही तुला घे" असें म्हणून त्यानें ती मंजरी महाश्वेतेच्या कानावर ठेविली. ती ठेवितांना त्याचा जो हस्तस्पर्श झाला त्यानें महाश्वेतेच्या अंगावर सात्त्विक रोमांच उभे राहिले. पुंडरीकाचीहि दृष्टि तिच्यावर खिळून राहिल्यानें तो देहभान विसरून गेला व त्याच्या हातांतली रुद्राक्षमाला



कपिंजल :—अरे, ती बघ, माळेबरोबर तुझे मनहि नेत आहे; ते तरी परत घे. ... (प्र० २)पृ. ५

लज्जेसह खालीं गळून पडली. महाश्वेतेनें चटकन ती मध्येंच झेलून आपल्या गळ्यांत घातली. इतक्यांत तिची दासी तरलिका येऊन सांगूं लागली कीं, " आईसाहेबांचें अंगधुणें होऊन घरीं परत जायची देखील वेळ झाली. याकरितां लवकर चलावें. "

महाश्वेता जड पावलांनीं अंग धुण्याकरितां जाण्यास निघाली. ती चार दोन पावलें जाते न जाते तोंच, किंचित् क्रोधाचा आविर्भाव आणून व कांहींशा चेष्टेच्या स्वरानें कपिंजल पुंडरीकास म्हणाला, " अहो राजश्री, आज आपलें चित्त ठिकाणावर नाहीं वाटतें ? आपणाला हें शोभतें का ? एकूण गुरुजींनीं आजवर केलेला उपदेश पालथ्या घागरीवर पाणी झाला म्हणावयाचें ? अरे गृहस्था, ही मुलगी तुझी स्मरणी घेऊन चालली हें तुला समजलें सुद्धां नाहीं आँ ! ती बघ, माळेपरी माळ नेते आहे व तिजबरोबर तुझें मनहि चोरून नेत आहे. तेवढें तरी आवरून धर.[१] मनोनिग्रह हेंच सज्जनांचें धन होय ! "

हें ऐकून पुंडरीक भानावर येऊन किंचित् शरमला, आणि 'या पोरीचा दांडगेपणा मी कधींहि सहन करणार नाहीं ' असें मोठ्यानें बोलत बोलत त्यानें लागलीच महाश्वेतेच्या पाठोपाठ धूम ठोकली व बळेंच रागावल्यासारखें करून व भिंवया वर चढवून तो तिला म्हणाला, ' चपले, माझी स्मरणी परत दिल्याखेरीज खबरदार एक पाऊल पुढें टाकशील तर. चोरटी कुठली !'

" ही घ्या आपली माळ, मग तर झालें ?" असें म्हणून तिनें आपल्या गळ्यांतील मोत्यांची माळ काढून त्याच्या हातावर टाकली व त्यानेंहि पण ती गळ्यांत घातली ! आपण काय गळ्यांत घालीत आहोंत हें त्याच्या मुळींच लक्ष्यांत आलें नाहीं.

---

१ [illegible]

नंतर कसेंबसें अंग धुऊन महाश्वेता घरीं गेली, पण तेव्हांपासून तिला कांहीं सुचेनासें झालें.

---

## प्रकरण ३ रें

## पुंडरीकाचें पत्र

इकडे पुंडरीकाची अवस्था महाश्वेतेसारखीच थोडीफार झाली. ही स्त्री कोण, कोठली, कोठें चालली आहे, इत्यादि गोष्टींबद्दल त्याच्या मनांत जिज्ञासा उत्पन्न झाली. त्या वेळीं त्याचा मित्र कपिंजल फुलें वेंचण्यास गेला होता. ही संधि साधून ज्या मार्गानें महाश्वेता गेली त्याच मार्गानें तो चालूं लागला. वाटेंत त्यास तरलिका भेटली. तिला तिच्या यजमानणीचें नांवगांव पुंडरीकानें विचारल्यावरून तिनें संपूर्ण वृत्त कथन केलें. त्यामुळें लगेच पुंडरीकाची कळी खुलली. त्यानें शिळेवर कोंवळ्या कोंवळ्या तमालपत्रांचा रस काढून त्या रसानें वल्कलाच्या तुकड्यावर नखानें महाश्वेतेस कविताबद्ध पत्र लिहिलें. 'कमळाच्या देंठासारखा शुभ्र मुक्ताहार दाखवून राजहंसाला चाळवीत चाळवीत न्यावें, त्याप्रमाणें माझ्या हातावर मोत्यांची माळ टाकून तूं माझें मन तुजकडे चोरून नेलेंस ' या आशयाचा त्यांत मजकूर होता.

तरलिका पत्र घेऊन गेली तरी त्या ठिकाणाहून परत फिरण्यास पुंडरीकाचें मन घेईना. चैत्ररथ अरण्यांतच तो इकडे तिकडे फिरूं लागला.

आपला मित्र आतां येईल मग येईल या आशेनें कपिंजलानें घटका दोन घटका त्याची वाट पाहिली. नंतर ' मन चिंती तें वैरी न चिंती ' या न्यायानें आपल्या मित्रास कांहीं बरें वाईट तर झालें

नसेल ना, असें मनांत येऊन तो त्याच्या शोधार्थ निघाला. सायंकाळपर्यंत पुंडरीकाचा कांहींच थांगपत्ता लागेना तेव्हां तो हताश झाला. अखेरीस एका लतामंडपांत स्वस्थ पडलेली आपल्या मित्राची मूर्ति जेव्हां त्याच्या दृष्टीस पडली तेव्हां एकदांचा त्याचा जीव खालीं पडला! मित्राला[१] कुमार्गापासून शक्य तोंवर परावृत्त करणें हें सन्मित्राचें कर्तव्य होय, या उक्तीप्रमाणें पुंडरीकाची कानउघाडणी करून त्यास ताळ्यावर आणण्याची कपिंजलानें आपल्या परीनें पराकाष्ठा केली. पण ज्याचें नांव तें! त्यानें पुष्कळ उपदेश करून पाहिला; पण व्यर्थ. शेवटीं महाश्वेतेची या बाबतींत गांठ घेतल्यावांचून गत्यंतर नाहीं असा मनाशीं दृढ संकल्प करून तो त्या मार्गाला लागला.

---

प्रकरण ४ थें.

## मित्राची चिंता

घरीं पोंचल्यावर तरलिकेनें आपल्या बाईसाहेबांस पुंडरीकाचें पत्र एकांतीं देऊन इत्थंभूत वर्तमान निवेदन केलें. तें ऐकून महाश्वेतेला अत्यंत हर्ष झाला आणि ती मोठ्या आतुरतेनें लतिकेस खोदून खोदून अनेक प्रश्न पुनः पुनः विचारूं लागली.

सायंकाळच्या सुमारास तरलिकेनें महाश्वेतेस अशी वर्दी दिली कीं, सकाळीं आपण पाहिलेल्या ऋषिकुमारांपैकीं एक द्वारापाशीं येऊन उभा आहे. मी रुद्राक्षमाला आणण्याला आलों आहों असें तो म्हणतो.

---

१ सुहृदा सुहृदसन्मार्गप्रवृत्तो यावच्छक्तितः सर्वात्मना निवारणीयः ।

लागलीच महाश्वेतेनें कंचुकीकडून त्यास आंत बोलावून आणिलें. उठून त्यास नमस्कार केला, बसण्यास उच्च सुखासन आणून दिलें व ती स्वतः मात्र भुईवर बसली.

मग कपिंजलानें सकाळपासून घडलेलें सर्व वृत्त कथन केलें. तुझ्या दर्शनाची पुंडरीकास उत्कंठा लागली असून त्याची प्राणान्तिक अवस्था झाली आहे असें त्यानें महाश्वेतेला काकुळतीनें सांगितलें व म्हटलें, 'राजपुत्रि, प्राणत्याग[1] करून देखील सुहृदाचें रक्षण करावें असें शास्त्र सांगतें. मी तुझ्याकडे आलों आहें तो सुहृदाचे प्राण वांचवावें म्हणून. तरी अशा प्रसंगीं तुला उचित वाटेल तें तूं कर. मी अधिक काय सांगूं? मला कांहींच सुचत नाहीं.'

कपिंजलाच्या प्रत्येक शब्दागणिक महाश्वेतेचें मुखकमल अधिकाधिक प्रफुल्लित होत होतें व आपणांवर हा अनुग्रहच होत आहे असें ती आपल्या मुद्रेनें दर्शवीत होती.

इतक्यांत एक दासी येऊन सांगूं लागली कीं, आपली प्रकृति बरी नसल्याचें समजल्यावरून आईसाहेब आपल्या समाचारास येत आहेत. हें ऐकून कपिंजल महाश्वेतेचा निरोप घेऊन लगबगीनें निघून गेला.

---

१ प्राणपरित्यागेनापि रक्षणीयाः सुहृदसवः।



पुंडरीकाचे प्राण वाचीव अशी कपिजल महाश्वेतेची विनवणी करितो.... (प्र. ४) पृ. ८

## प्रकरण ५ वें.

# दोन शाप

आईसाहेब समाचार घेऊन गेल्यावर महाश्वेता तरलिकेस बरोबर घेऊन पुंडरीकाच्या भेटीस जावयास निघाली. त्या वेळीं पिठासारखें स्वच्छ चांदणें पडलें होतें. सकाळीं गळ्यांत घातलेली रुद्राक्षमाला अद्याप तिच्या गळ्यांतच होती. कानावर कुसुममंजरी होती तीहि तशीच होती. महाश्वेता उत्कंठेनें झपाझप पावलें टाकीत चालली होती हें खरें; पण काय असेल तें असो, तिचें मन मात्र व्याकुळ होत चाललें होतें व उजवा डोळा लवून तिला क्षणोक्षणीं दुश्चिन्हें होत होतीं.

ज्या लताकुंजांत पुंडरीक तळमळत पडला होता, तेथें महाश्वेता जाऊन पोंचण्यापूर्वींच आपण जाऊं आणि काय चाललें आहे तें पाहूं.

चंद्र उगवला आणि तो जसजसा वर येऊं लागला तसतसा पुंडरीकास चंद्रप्रकाशाचा ताप होऊं लागला; म्हणून संतापाच्या भरांत त्यानें चंद्रास शाप दिला तो असा —

"हे निशानाथा, विरहिजनांस तूं ज्याअर्थीं निष्कारण ताप देतोस त्याअर्थीं मजप्रमाणेंच प्रियजनांच्या वियोगानें दुःखित होऊन तुला मृत्युलोकीं दोन जन्मीं प्राण सोडावा लागेल."

आपण अमृताचा वर्षाव करून सर्व जगाला आनंदित करीत असतां हा आपणास विनाकारण शाप देत आहे, याचा राग येऊन चंद्रानेंहि पुंडरीकास असा उलट शाप दिला कीं, "इच्छित वस्तु प्राप्त होण्यापूर्वीं तुलाहि दोन वेळां जन्माला यावें लागेल".

चंद्रमा वर वर येत चालला व त्याच वेगानें पुंडरीकाची जीव-ज्योत मावळत चालली. 'हा प्रिये महाश्वेते ! हा मित्रा कपिंजला !

हे ताता श्वेतकेतो ! हे माते लक्ष्मि ! अशा प्रकारें खोल आवाजांत त्याच्या तोंडून उद्गार निघत होते. याच सुमारास कपिंजल तेथें येऊन पोंचला. मित्राची मरणोन्मुख अवस्था पाहून त्याला स्वतःला मरणप्राय दुःख झालें. पण उपाय काय ? अमोघ शापाक्षरांचा अखेर परिणाम व्हावयाचा तो झालाच. पुंडरीकाची प्राणज्योति मालवली. शोकविव्हल होऊन कपिंजल भूमीवर गडबडा लोळूं लागला.

"हाय हाय, सख्या पुंडरीका, तूं कोठें रे गेलास ? अगे महाश्वेते, यानें तुझें असें काय केलें होतें ? दुरात्म्या चंद्रा, झालासना एकदांचा कृतार्थ ? भगवन् श्वेतकेतो, हा आपला पुत्रघात झालेला आपणांस कळला नसेल काय ? हे तपा, तूं निराश्रित झालेंस. धर्मा, तुझें मूळ नाहींसें झालें. हे सरस्वति, तूं विधवा झालीस. सत्या, तूं अनाथ झालेंस. मित्रा पुंडरीका, माझी तरी वाट पाहा रे ! एकटा कोठें चाललास ?"

कपिंजलाचा असा विलाप चालला असतां महाश्वेता त्या स्थानाजवळ येऊन पोहोंचली. तिच्या कानीं तो विलाप पडतांच तिनें भयंकर किंकाळी फोडली. ती धावत धावत पुंडरीकाजवळ गेली व त्यास निश्चेष्ट पडलेला पाहून तिच्या डोळ्यांस अंधेरी आली.

'हा नाथा, मला एकटीला सोडून आपण कसे हो गेलां ? मीच आपल्या नाशास कारणीभूत झालें !' असा आक्रोश करीत ती मूर्च्छित होऊन पडली.

मग तरलिकेनें तिच्या मस्तकावर पाणी शिंपडलें, तेव्हां ती सावध होऊन म्हणाली, 'तरलिके, जा, काष्ठें आणून चिता प्रज्वलित कर; ही मीं पण तिकडेच चाललें.'

इतक्यांत एक अद्भुत चमत्कार झाला. चंद्रबिंबांतून एकाएकीं एक दिव्य पुरुष खालीं उतरला व पुंडरीकाचें प्रेत हातांत घेऊन वर जाऊं लागला. जातां जातां महाश्वेतेकडे वळून तो म्हणाला,

"मुली, प्राणत्याग करूं नकोस. फिरून तुझा याच्याशीं समागम होईल." महाश्वेता भयचकित झाली. 'मी काय पाहातें आहे? माझे नेत्र मला फसवीत तर नाहींत ना? हें आहे तरी काय?' अशा प्रकारें विस्मित होऊन ती कपिंजलास या चमत्काराचा अर्थ विचारूं लागली. कपिंजल कांहींच उत्तर न देतां ताडकन उठून उभा राहिला आणि वर पाहूं लागला; आणि कंबर बांधीत बांधीत उद्गारला, 'थांब, थांब, दुष्टा, अरे, माझ्या प्रियसख्यास घेऊन तूं कोठें चाललास?' असें बोलत तोहि आकाशांत उंच उडून चंद्रलोकांत गेला. क्षणभर महाश्वेता स्तंभित झाली. तिच्या मुखांतून शब्द उमटेना. ती प्राणत्याग करण्यास सिद्ध झाली. तेव्हां तरलिका दीन वाणीनें म्हणाली,

'बाईसाहेब, तो पुरुष देवासारखा दिसत होता. त्याचा शब्द कधींहि खोटा व्हायचा नाहीं. कपिंजलमुनि त्याच्या मागोमाग गेलेच आहेत. ते परत येऊन आपणांस भेटल्याखेरीज राहणार नाहींत. तो दिव्य पुरुष कोण, त्यानें पुंडरीकास कां नेलें, कोठें नेलें आणि हें आश्वासन कां दिलें या सर्व गोष्टींचा मग उलगडा होईल. तर मी आपल्या पायां पडून मागणें मागतें कीं, तेथपर्यंत आपण असला अविचार करूं नये.'

महाश्वेतेस तरलिकेचें म्हणणें पूर्णपणें पटलें. आशा[1] ही मोठी कठीण आहे. ती काय काय करायला लावीत नाहीं? महाश्वेतेनें प्राणत्याग करण्याचा विचार सोडून तपश्चर्येंत काळ घालविण्याचा निश्चय केला. प्रिय पुंडरीकाचा कमंडलु, त्याचींच वल्कलें व त्याचीच अक्षमाला तिनें धारण केली. आणि त्रिभुवनाचा स्वामी व अनाथांचा नाथ जो कैलासनाथ त्याची आराधना करीत ती तेथेंच राहूं लागली.

---

१ आशया हि किमिव न क्रियते?

दुसऱ्या दिवशीं महाश्वेतेच्या मातापितरांस हें वर्तमान समजलें. तेव्हां तीं शोध करीत करीत तेथें आलीं. एकुलत्या एक कन्येचा हा निर्धार पाहून त्यांस अत्यंत दुःख झालें. तिनें घरीं चलावें म्हणून तिची अनेक प्रकारें समजूत घालण्याची त्यांनीं शिकस्त केली. पण निष्फळ. शेवटीं निराश होऊन आल्या पावलींच त्यांस परत जावें लागलें.

---

## प्रकरण ६ वें

# चंद्रलोकांत

ज्यानें पुंडरीकास उचलून नेलें तो प्रत्यक्ष चंद्रच होता. त्याच्या मागोमाग कपिंजल जेव्हां चंद्रलोकास पोहोंचला, तेव्हां चंद्रदेव त्यास म्हणाला, "तुझ्या मित्राला येथें आणणारा मी साक्षात् चंद्र आहें. पुंडरीक व मी समदुःखी आहों. आम्ही परस्परांस शाप दिल्यामुळें आम्हांस मृत्युलोकांत दोन वेळां जन्मास यावें लागणार आहे. पुंडरीकास शाप दिल्याबद्दल मला आतां फार पश्चात्ताप होत आहे. कारण महाश्वेतेचा जन्म माझ्याच किरणांपासून झाला म्हणून तिनें मनानें वरलेला पति जो हा पुंडरीक तो पर्यायानें माझा जांवई लागतो. याच्या देहाचा नाश होऊं नये म्हणून मुद्दाम त्यास येथें आणून मी त्याचें रक्षण करीत आहें. शापाचा परिहार झाल्यावर मी आपल्या अमृतमय किरणांनीं यास जिवंत करीन. मग तुझ्या सुहृदास पूर्वरूप प्राप्त होऊन त्याचे मनोरथ परिपूर्ण होतील. कपिंजला, तूं आतां मनुष्यलोकीं जा व महाश्वेतेस हें वृत्त सांगून तिच्या दुःखित मनास धीर दे."



विमानस्थ देव कपिंजलास शाप देत आहे. ... (प्र० ६) पृ. १२

भगवान श्वेतकेतूला हा वृत्तान्त कळला तर ते महातपस्वी म्हणून कांहीं तरी उपाय करतील या हेतूनें कपिंजल चंद्रलोकांतून परत येतांना प्रथम त्यांच्या आश्रमाकडे जावयास निघाला. आकाशमार्गांत विमानांतून जाणाऱ्या एका कोपिष्ट गंधर्वाला त्याचा धक्का लागला; तेव्हां रागावून त्यानें कपिंजलास असा शाप दिला कीं, 'अरे दांडग्या, या विस्तीर्ण नभोमार्गांत सुद्धां तूं मला खेटून घोड्यासारखा भरधांव दवडत चालला आहेस म्हणून तूं घोडा होशील.'

वास्तविक यांत कपिंजलाची फारशी चूक नव्हती. तो शोकातिरेकानें अंध झाला असल्यानें त्याच्या हातून हा लहानसा अपराध घडला; घमेंडीनें नव्हे. यास्तव त्यानें प्रणाम करून गंधर्ववैमानिकाची प्रार्थना केली. तेव्हां त्यास करुणा येऊन तो म्हणाला, मी शाप देऊन चुकलों; तो आतां खरा होणारच; तुला तो भोगल्याशिवाय सुटका नाहीं. तथापि तुझें अलौकिक मित्रप्रेम मीं दिव्य दृष्टीनें पाहिलें, त्यामुळें तुला एवढाच उःशाप देतों कीं, अश्वयोनींतहि तुझा व तुझ्या मित्राचा सहवास घडेल आणि पूर्वजन्मींची तुझी स्मृति कायम राहील.

कपिंजलास दुःखांत सुख एवढेंच वाटलें कीं, आपला मित्र भूलोकीं जन्मास यावयाचा आहे व त्याच्याजवळ जर आपणास राहण्याला मिळालें तर घोड्याचा जन्म आला तरी तें भाग्यच होय.

लागलीच तो आकाशांतून समुद्रांत पडला व घोडा होऊन बाहेर आला.

आतां या जिवलग स्नेह्यांचें पुढील जन्मांत काय काय होतें तें पाहूं.

# भाग दुसरा



## प्रकरण ७ वें

## तारापीड आणि विलासवती

या काळीं अवन्ती देशांत तारापीड म्हणून एक अतुलप्रतापी, वैभवशाली व पुण्यशील राजा राज्य करीत होता. तो अत्यंत न्यायी व प्रजाहितदक्ष असे. प्रजेला संतुष्ट ठेवणें व तिचें पुत्रवत् पालन करणें हेंच त्यास भूषण वाटे. तो स्वतः लोकांच्या भेटी घेऊन त्यांचीं गाऱ्हाणीं ऐकत असल्यामुळें प्रजा त्याला धर्मराजाचा अवतार मानी. त्याचा पराक्रम पाहून जनता त्याला अर्जुनाची उपमा देई. बाहुबलानें पृथ्वीवरील सर्व राजांना त्यानें पादाक्रांत केल्यामुळे ते त्याच्या पद-कमलावर आपले मुकुट नमवीत असत. त्याची अपरंपार संपत्ति पाहून साक्षात् लक्ष्मीच येथें वास करीत आहे असें लोकांस वाटे.

दशरथाचा जसा वसिष्ठ, तसा तारापीडाचा शुकनास नामक ब्राह्मण प्रधान होता. हा धर्मशास्त्र व राजनीतिशास्त्र यांत पारंगत असून राज्यकारभारांत तारापीडास साहाय्य करी. त्यानें राज्याची व्यवस्था इतकी चोख ठेविली होती कीं, त्यामुळें त्याजवरहि लोकांची राजासारखीच प्रीति जडली होती.

अवन्ती देशाची राजधानी उज्जयिनी सिप्रा (क्षिप्रा) नदीच्या काठीं आहे. तिचा महिमा काय वर्णावा ? भगवान महाकालाचें तेथें स्वयंभू स्थान आहे. कैलासीं राहणें न आवडून प्रत्यक्ष महेश्वर या स्थळीं वास करीत आहे अशी सर्व लोकांची श्रद्धा होती. तेथील

देवालयांचे कळस सुवर्णाचे असून त्यावर उभारलेले शुभ्र ध्वज जणूं हिमालयाचीं बर्फाच्छादित शिखरेंच आहेत असें भासे. तेथील बाजारपेठेंत रत्नांचे ढीगच्या ढीग लागलेले असत. नगरीबाहेरचे प्रदेश हे उद्यानें, बगीचे व विहारभूमि यांनीं शोभायमान दिसत असत.

तारापीडाच्या राज्यांत सर्वत्र शांतता, स्वस्थता व सुबत्ता नांदत असल्यामुळें वास्तविक त्यास कसलीच चिंता उरली नव्हती. पण त्याच्या स्वर्गतुल्य अपार वैभवांत एकच काय तो उणेपणा होता. तो म्हणजे त्यास पुत्रसंतान नव्हतें.

एकदां त्याची राणी महाशिवरात्रीनिमित्त महाकालाच्या देवालयांत पुराणास गेली होती. योगायोग असा कीं, 'निपुत्रिकाला[१] सद्गति नाहीं ' हा विषय त्या दिवशीं पुराणिकबोवांच्या प्रवचनांत निघाला होता. त्या दिवसापासून विलासवती मनांत फारच कष्टी झाली. तिनें सर्व विलास वर्ज्य केले. तिला अन्नपाणी गोड लागेना. ती एकसारखी डोळयांतून टिपें गाळूं लागली. दासीमुखानें राणीसाहेबांच्या दुःखाचें कारण राजाच्या कानावर गेलें. तेव्हां तो तिच्या मंदिरांत आला व तिला त्यानें असा उपदेश केला :— देवि, ज्या गोष्टी आपल्या स्वाधीन नसून ईश्वराच्या अधीन आहेत त्यांबद्दल उगाच शोक करीत बसून काय उपयोग ? आपल्या पोटीं संतान नाहीं हा विचार मलाहि रात्रंदिवस जाळीत असतो. सर्व राज्य व जीवित हीं अगदीं उदास वाटत आहेत. "महाराज, आपणांस मुलगा झाला" असें आनंदाचें वर्तमान सांगण्यास सेवक मजकडे कधीं धांवत येईल, असें मला झालें आहे. मांडीवर मुलाला घेतलेल्या राणीसाहेबांना मी केव्हां पाहीन अशी मलाहि उत्कंठा लागून गेली आहे. इकडे तिकडे दुडदुड धावणारें छबुलें या वाड्याच्या अंगणास केव्हां बरें शोभा

१ अपुत्राणां किल गतिर्नास्ति ।

आणील याविषयीं मी अत्यंत उत्सुक झालों आहें. परंतु आपलें दैवच प्रतिकूल पडलें त्याला काय करायचें ? पूर्वजन्मीं आपण पुण्य केलें नाहीं त्याचें हें फळ होय. [१]मागील जन्मीं केलेलें शुभाशुभकर्म या जन्मीं मनुष्यास फळ देत असतें. [२]शहाण्यासुरत्यालाहि दैव फिरवितां येत नाहीं. याकरितां प्रिये, तूं शोक सोडून दे. दशरथ राजा वृद्ध होईपर्यंत त्यास पुत्र नव्हता. परंतु पुढें ऋष्यशृंगाच्या कृपाप्रसादानें त्यास चार पुत्र झाले. तूंहि देवधर्म करून मुनिजनांची सेवा करीत जा, म्हणजे तुझेहि मनोरथ पूर्ण होतील. मुनिश्रेष्ठांची सेवा घडली असतां ती कधींहि निष्फळ होत नाहीं. [३]धर्मावर ज्यांची निष्ठा आहे त्यांच्या शेजारींच कल्याण व संपत्ति संचार करीत असतात."

---

## प्रकरण ८ वें

## पुनर्जन्म

राणी विलासवती त्या वेळेपासून देव, ब्राह्मण व गुरु यांची मोठ्या भक्तीनें सेवा करूं लागली. पुढें एके दिवशीं पहांटेस राजास असें स्वप्न पडलें कीं, विलासवतीच्या मुखांत चंद्र प्रवेश करीत आहे. जागा झाल्यावर त्यानें तें स्वप्न शुकनासास सांगितलें. तेव्हां तो म्हणाला, "महाराज, [४]पहांटेचीं स्वप्नें प्रायः खरीं ठरतात. यावरून थोड्याच दिवसांत आपले मनोरथ सिद्धीस जाऊन चंद्रासारखा तेजस्वी, व

---

१ जन्मान्तरकृतं हि कर्म फलमुपनयति पुरुषस्येह जन्मनि ।

२ न हि शक्यं दैवमन्यथा कर्तुं अभियुक्तेनापि ।

३ धर्मपरायणानां हि समीपसंचारिण्यः कल्याणसंपदो भवन्ति ।

४ अवितथफला हि प्रायो निशावसानसमये दृष्टा भवन्ति स्वप्नाः ।

अखिल जगास आनंद देणारा पुत्र, आपल्या दृष्टीस पडणार ! मलाहि आज असें स्वप्न पडलें कीं, एक दिव्य ब्राह्मण माझ्या पत्नीच्या मांडीवर एक पांढरें कमल ठेवीत आहे. 'हीं सुचिन्हें पुढें येणाऱ्या आनंदाची निदर्शक आहेत खचित."

पुढें दहाव्या महिन्यांत एका शुभ दिवशीं विलासवती प्रसूत होऊन तिला पुत्ररत्न झालें. सर्व जनता आनंदांत पोहूं लागली. ब्राह्मण शांतिपाठ म्हणूं लागले. हा मुलगा चक्रवर्ती सम्राट् होणार असें सर्व ज्योतिष्यांनीं ऐकमत्यानें भविष्य वर्तविलें.

पुत्राचा मुखचंद्र तारापीडानें डोळे भरून पाहिला. आपल्या स्नेहभरित नेत्रांनीं तो पुनः पुनः बालकाच्या रूपाचें प्राशनच करीत आहे कीं काय असें दिसलें. उभयतां राजाराणीस आपण कृतकृत्य झालों असें वाटलें. आपलें भविष्य तंतोतंत खरें ठरलेलें पाहून प्रधानास पराकाष्ठेचा आनंद झाला. तो तारापीडास म्हणाला, "महाराज" आपण जो स्वप्नांत चंद्रमा पाहिला तो स्वतः राणी-साहेबांच्या पोटीं जन्मास आला आहे. याच्या बोटांवरील हें पाहा चक्र, हा पाहा शंख, हें पाहा कमल. हीं सार्वभौमत्वाचींच लक्षणें आहेत यांत मुळींच संदेह नाहीं."

अशा प्रकारें बालकाकडे बोट दाखवून शुकनास त्याचें वर्णन करीत असतां मंगलनामक एक सेवक तेथें धावत धावत आला आणि राजास सांगूं लागला कीं, महाराज, मनोरमादेवीस पुत्र झाला. आपण धन्य आहां. हें ऐकून तारापीडानें प्रधानाचें अभि-नंदन करून म्हटलें, 'पाहा, दुःखें जशीं एकापाठोपाठ एक येतात

१ आवेदयन्ति हि प्रत्यासन्नमानन्दमग्रजातानि शुभानि निमित्तानि ।

तशीं सुखें येऊं लागलीं म्हणजे सुखावर सुखें प्राप्त होतात[1].' त्या वेळीं सर्वांस आनंदाचें भरतें आलें.

उज्जयिनींतील लोकांनीं गुढयातोरणें उभारून दहा बारा दिवस महोत्सव साजरा केला. सर्व ठिकाणीं देणग्यांचा आणि दानांचा वर्षाव झाला व अशा प्रकारें राज्य आनंदोत्सवांनीं दुमदुमून गेलें. बारशाच्या दिवशीं तारापीडानें आपल्या पुत्राचें नांव चंद्रापीड असें स्वप्नास अनुसरून ठेविलें; आणि प्रधानानें आपल्या मुलाचें वैशंपायन असें ब्राह्मणोचित नामकरण केलें.

---

## प्रकरण ९ वें.

## विद्याभ्यास

चंद्रापीड व वैशंपायन पांचसहा वर्षांचे होऊन त्यांस धुळाक्षरें येऊं लागल्यावर तारापीडानें उज्जयिनीनगराबाहेर शिप्रा नदीचे तीरीं एक भव्य विद्यालय बांधलें व त्या ठिकाणीं सुमुहूर्तावर त्यांस नेऊन ठेविलें. त्यांना शिकविण्यासाठीं धनुर्विद्या, अश्वविद्या, दंडनीति, न्यायव्याकरणादि शास्त्रें व विविध कला यांत प्रवीण अशा विद्वान गुरूंची त्यानें योजना केली. गुरुपुत्र व समवयस्क छात्रगण यां-खेरीज दुसरें फारसें तेथें कोणी नसे.

विद्यामंदिराभोंवतीं उंच उंच तट बांधले असून, खेळण्याला, घोड्यावरून रपेट करण्याला व व्यायाम घेण्याला विस्तृत व प्रशस्त पटांगण ठेविलें होतें. मुलांस शहराचा संपर्कहि लागूं नये अशी

---

१ विपद् विपदं संपत् संपदमनुबध्नाति ।

व्यवस्था केलेली होती. राणीनें कितीहि विनवण्या केल्या तरी राजानें मुलास कधींहि घरीं आणिलें नाहीं. मात्र दररोज सकाळीं विलासवतीसह मुलास भेटून, विचारपूस करून तो परत येत असे.

क्रमाक्रमानें चंद्रापीड व वैशंपायन सर्व विद्या व कला यांत पारंगत झाले. बौद्धिक शिक्षणाप्रमाणें मुलांच्या शारीरिक शिक्षणाकडेहि गुरुजी लक्ष्य देत असत. पोहणें, घोड्यावर बसणें, रथ हांकणें व हत्ती चालविणें या गोष्टी त्यांना येऊं लागल्या. गदा फिरविणें, तरवार परजणें, भाला फेकणें व नेम मारणें इत्यादि शस्त्रास्त्रविद्याहि त्यांनीं हस्तगत केल्या. चित्रकला व गायनवादनादि ललितकलांकडेहि त्यांनीं लक्ष पुरविलें. अश्वपरीक्षा व रत्नपरीक्षा कशी करतात ह्यांचेंसुद्धां त्यांनीं ज्ञान करून घेतलें. धर्मशास्त्र, राजनीतिशास्त्र, ज्योतिषशास्त्र इत्यादि शास्त्रांचें त्यांनीं मन लावून अध्ययन करून त्यांबरोबरच काव्यें, नाटकें, पुराणें व इतिहास या ग्रंथांचें एकाग्रतेनें परिशीलन केलें. ज्याप्रमाणें आरशाच्या स्वच्छ भिंगावर सूर्याचें प्रतिबिंब पडतें त्याप्रमाणें त्यांच्या बुद्धिरूपी निर्मल दर्पणावर सर्व विद्या प्रतिबिंबित झाल्या. कुलपतींची व इतर गुरुजींची त्यांच्यावर मर्जी बसून त्यांना या दोन शिष्यांबद्दल फार धन्यता वाटूं लागली.

चंद्रापीड व वैशंपायन या दोघांची बुद्धि तीव्र असल्यामुळें त्यांना अध्ययनाची स्वभाविकच आवड वाटूं लागली. गुरूपदेशाप्रमाणें अभ्यास करण्यांत व आपल्या सवंगड्याबरोबर खेळण्यांत ते इतके रंगून गेले कीं त्यांना घरची फारशी आठवण होत नसे. दोघेहि खेळांत सारखेच पटाईत झाले. पण वैशंपायनास मात्र चंद्रापीडाइतकें शरीरसामर्थ्य कमावितां आलें नाहीं. इतर कोणत्याहि बाबतींत तो चंद्रापीडापेक्षां अणुभरहि कमी नव्हता. चंद्रापीड भीमाप्रमाणें धिप्पाड दिसूं लागला. सहज खेळतां खेळतां त्यानें हत्तीच्या

छाव्याचे कान धरले तर छाव्याला जागचें हालतां येत नसे. तो ऐन भरज्वानींत असल्यानें व छाती, दंड, मांड्या वगैरे सर्व अवयव भरदार झाल्यामुळें त्याचें शरीर तेजःपुंज दिसूं लागलें.

चंद्रापीड व वैशंपायन हे एकत्र वाढल्यामुळें व त्यांच्या समानशीलत्वामुळें साहजिकच त्यांचें परम सख्य जमलें. एकाशिवाय दुसऱ्यास क्षणभरहि चैन पडत नसे. सूर्यास सोडून जसा दिवस राहात नाहीं त्याप्रमाणें चंद्रापीडास सोडून वैशंपायन कधींहि एकटा दिसत नसे.

---

## प्रकरण १० वें

# गुरुकुलाहून परत

चंद्रापीड व वैशंपायन यांचा दहा वर्षांनीं विद्याभ्यास पुरा झाल्यावर त्यांस घरीं नेण्याविषयीं आचार्यांनीं त्यांच्या वडिलांस कळविलें. तेव्हां राजाराणीस जिवाची कृतार्थता वाटली. चांगला दिवस पाहून तारापीडानें बलाहक सेनापतीस सेनेसह विद्यामंदिराकडे पाठवून दिलें. बलाहकानें कुलपतींच्या संमतीनें चंद्रापीडाची भेट घेऊन त्यास राजाची आज्ञा कळविली व लवून मुजरा करून तो म्हणाला, ' महाराज, आपणांस यौवराज्याभिषेक करावा असा आपल्या परमपूज्य वडिलांचा मनोदय आहे. आपलें अध्ययन आतां संपूर्ण झालें आहे, तरी घरीं येऊन आपण बंधुवर्गास आनंदित करावें. पारसीक देशच्या राजानें थोरल्या महाराजांस एक दिव्य अश्व नजर केला आहे. तो बाहेर उभा आहे. त्याच्यावर आपण आरूढ व्हावें. त्याचें नांव इंद्रायुध. त्याची उत्पत्ति समुद्रापासून झाली आहे. तो वाऱ्यासारखा वेगवान असून गरुडासारखा चपळ आहे. इंद्राच्या

उच्चैःश्रवस अश्वाप्रमाणें तो सर्व दिव्य लक्षणांनीं युक्त आहे. किंबहुना न भूतो न भविष्यति अशा प्रकारचा हा घोडा आहे असें म्हटलें तरी चालेल.'

हा घोडा आहे तरी कसा तें पाहावें अशी चंद्रापीडास अनावर इच्छा होऊन त्यानें घोड्यास आंत घेऊन येण्यास बलाहकाला आज्ञा केली. दोन माणसांनीं इंद्रायुधास दोन्ही बाजूंस धरून विद्यामंदिरांत नेलें. त्याचा इंद्रधनुष्याप्रमाणें वर्ण पाहून हा सूर्याच्या रथाचा घोडा खालीं आला कीं काय असें चंद्रापीड मनांत म्हणाला. अश्वपरीक्षेंत तो तरबेज असल्यामुळें 'हा घोडा पूर्वजन्मीं कोणी महापुरुष असून कांहीं कारणास्तव यास घोड्याचें रूप प्राप्त झालें असावें' असें त्यानें अनुमान केलें. तेव्हां याच्यावर आरोहण करावें कीं नाहीं अशी त्याच्या मनांत शंका उत्पन्न झाली. तथापि पित्राज्ञा शिरसावंद्य मानून घोड्यावर बसण्याकरितां तो आसनावरून उठला व मनांत म्हणालाः अश्वा, तूं कोण असशील तो ऐस. मी तुझ्या पाठीवर बसतों आहें याची मला क्षमा कर. चंद्रापीडाचा अभिप्राय जाणून कीं काय, इंद्रायुधानें आपल्या मानेवरचे केस हलवून वक्रदृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें आणि उजवा खूर भूमीवर आपटून व मधुर स्वरानें खिंकाळून जणूं चंद्रापीडास अनुमति दिली.

विद्यालयांतील गुरुवर्यांस वंदन करून व त्यांचा आशीर्वाद घेऊन चंद्रापीड इंद्रायुधावर आरूढ झाला. सैनिकांनीं त्याचा जयजयकार करून त्यास लवून प्रणिपात केला. वैशंपायन दुसऱ्या एका घोड्यावर स्वार होऊन चंद्रापीडाच्या पाठीमागून चालूं लागला. उज्जयिनीकडे तोंड करून जंगी मिरवणूक निघाली. राजपुत्राच्या मस्तकावर शुभ्र छत्र झळकत होतें. त्यास सुवर्णाचा दांडा असून मोत्यांची झालर लावलेली होती.

घोड्यांच्या टापांचे खाड खाड शब्द ऐकूं येऊं लागले. त्यांच्या

खिंकाळण्यांनीं व फुरफुरण्यांनीं कानठळ्या बसूं लागल्या. घोडे-स्वारांच्या हातांतील भाल्यांवर सूर्यकिरण पडून ते लकलक चमकूं लागले.

वेशीजवळ मिरवणूक येऊन पोंचली. चंद्रोदयानें समुद्रास भरती यावी त्याप्रमाणें चंद्रापीडाचें दर्शन होतांच जनतासमुद्र उचंबळून गेला. नगरीच्या खिडक्या भराभर उघडल्यानें उज्जयिनीनें आपले नेत्रच उघडले आहेत कीं काय असें भासलें. हा साक्षात् परमेश्वरच अव-तरला आहे असें वाटून पौरजनांनीं चंद्रापीडास नमस्कार केला. आपापलीं कामें टाकून व गडबडीनें गच्चीवर येऊन स्त्रियांनीं त्याच्या अंगावर लाह्या व फुलें उधळलीं; त्यांचा जागजागीं ढीग पडूं लागला. चंद्रदर्शनानें कुमुदें प्रफुल्लित होतात, त्याप्रमाणें नगरवासी जनांचीं मुखें प्रफुल्लित दिसूं लागलीं. ठिकठिकाणीं उभारलेल्या सुंदर कमा-नींतून हळू हळू येत येत मिरवणूक राजद्वाराजवळ येऊन थडकली. चंद्रापीड घोड्यावरून खालीं उतरून वैशंपायनाचा हात धरून वाड्यांत शिरला. बलाहक पुढें मार्ग दाखवीत चालला होता. द्वाराच्या दोहों बाजूंस भालदार–चोपदार सोन्याचे दंड घेऊन स्वागतार्थ उभ होते ते ललकारूं लागले. चौकांत एका बाजूस गंधमार्दन नामक हत्ती सांखळदंडानें बांधलेला होता. त्याच्या गंडस्थळांतून सारखा मदस्राव होत होता. त्यावर भ्रमरांचे थवे गुंजारव करीत होते. जागजागीं पहारेवाले नंग्या तरवारी घेऊन फिरत होते. पाळीव कस्तुरीमृग इकडे तिकडे फिरत असल्यामुळें कस्तुरीचा सुगंध चोहोंकडे दरवळून राहिला होता.

अशा प्रकारचे सात चौक ओलांडून चंद्रापीड तारापीडाच्या समीप गेला. त्यास पाहतांच राजाच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्यानें दोघांसहि प्रेमानें आलिंगन देऊन आपणांजवळ बसविलें; क्षेमकुशल विचारल्यावर राजा म्हणाला, ' चंद्रापीडा, तुझी आई सारखी तुझा

वाट पाहात आहे. म्हणून आधीं तिला भेट'. मग चंद्रापीड मातुः-श्रीच्या दर्शनास गेला.

विलासवतीनें गडबडीनें उठून त्याच्यावरून लिंबलोण उतरून टाकिलें व 'येरे माझ्या बाळा' असें म्हणून चंद्रापीडास पोटाशीं धरलें. त्याच्या पाठीवरून हात फिरवून तिनें मस्तकाचें अवघ्राण केलें व ती म्हणाली, 'चंद्रापीडा, तुझे वडील खरोखर निष्ठुर आहेत. नाहींतर त्यांनीं कोवळ्या वयांत या माझ्या बाळाला इतके दिवस माझ्यापासून दूर कां ठेवलें असतें? बाळ केवढें हें तुझें धैर्य! खेळण्याबागडण्याच्या दिवसांत तूं थोडींथोडकीं नाहींत तर दहा वर्षे विद्याभ्यासांत घालविलीस. तुझी गुरुभक्ति अलौकिक आहे. सर्व विद्यांनीं अलंकृत अशा तुला मी आतां जसें पाहिलें तसें तुझें लगीन झालेलें मी कधीं बघेन असें मला झालें आहे.'

शेवटचें वाक्य ऐकून चंद्रापीड अंमळ लाजला व मंदस्मित करून खालीं पाहूं लागला.

नंतर त्यानें आपल्या स्वतःकरितां खास बांधलेल्या भव्य प्रासादांत थाटानें प्रवेश केला. मंगलवाद्यें वाजूं लागलीं. त्यांच्या घोषानें दशदिशा भरून गेल्या. चंद्रापीडानें इंद्रायुधास स्वतःच्या नजरेखालींच बांधण्याची व्यवस्था केली. आणि प्रथम त्यास दाणापाणी घालून मग त्यानें स्वतःचे स्नानभोजनादि विधि उरकले.

## प्रकरण ११ वें

# दिनचर्या

दुसऱ्या दिवशीं सूर्योदयापूर्वींच चंद्रापीड इंद्रायुधावर बसून मृगया करण्याकरितां वनास जाण्यास निघाला. कुत्रे बाळगणारे शिकारी लोक त्याच्याबरोबर आरडाओरड करीत चालले. त्यामुळें चद्रापीडाचा उत्साह द्विगुणित झाला. रानांत गेल्यावर त्यानें अचुक शरसंधान करून, मदोन्मत्त हत्ती, सिंह, रानडुकरें व हजारों हरिणें मारिलीं आणि कित्येक वन्यपशू जिवंत पकडले.

मध्यान्ह काल झाला. चंद्रापीडाचें अंग घामानें चिंब झालें. वृक्षाच्या नव पल्लवांनीं तो वारा घेऊं लागला. इंद्रायुधाच्या तोंडावाटें फेंस निघूं लागला. तेव्हां घोडाहि दमला असें पाहून चंद्रापीड परत फिरला. “ तो रानडुकर केवढा मोठा होता, सिंहाची उडी किती लांब असते हो, हरिणें किती चपळ असतात पाहा”, अशा प्रकारें बरोबरच्या लोकांशीं तो मृगयेच्या गोष्टी बोलत येत होता.

मृगया करून परत आल्यावर चंद्रापीडानें मृगयेचा वेष उतरून ठेवला. मग तो स्नानगृहांत गेला. त्या ठिकाणीं सोन्याचे व रुप्याचे रत्नजडित कलश ठेविलेले होते. चांदीचा चौरंग मांडलेला होता. त्यावर बसून स्नान केल्यावर त्यानें मातु:श्रीकडून आलेले वस्त्रालंकार धारण केले आणि यथाविधि देवपूजा केली. नंतर त्यानें प्रथम वैशंपायनास उटी लावून मग ती आपल्या अंगास लाविली आणि सर्व मंडळींबरोबर तो आनंदानें भोजनास बसला. वैशंपायन त्याच्याजवळ बसून गप्पागोष्टी बोलत विविध पक्वान्नांचें वर्णन करीत होता त्यामुळें जेवणांत बहार उडाली. हें यांना वाढा, ते त्यांना वाढा, अशा प्रकारें सर्वांस त्यानें मोठ्या प्रेमानें आग्रह केला. भोजनोत्तर तांबूल भक्षण करीत करीत तो इंद्रायुधाचा समाचार घेण्यास गेला. आणि सेवक

त्याच्या आज्ञेची वाट पाहात उभे असतांहि त्यानें घोड्याचें गुण-वर्णन करीत करीत स्वतःच त्याच्यापुढें गवत टाकलें व त्याच्या पाठीवर थाप मारली.

याप्रमाणें चंद्रापीडाचा नित्यक्रम होता असें म्हटलें तरी चालेल.

---

## प्रकरण १२ वें

## पत्रलेखा

तिसरा दिवस उजाडला. विलासवतीनें पत्रलेखेस बरोबर देऊन कंचुकीला चंद्रापीडाकडे पाठविलें. तेथें गेल्यावर युवराजाला नमस्कार करून तो म्हणाला, 'महाराज, आजवर राणीसाहेबांनीं या मुलीचें लालनपालन केलें. हिचें नांव पत्रलेखा. ही अनाथ आहे. हिचे वडील कुलूत देशाचे राजे. त्यांना थोरल्या महाराजांनीं जिंकलें त्या वेळीं बंदी केलेल्या लोकांत ही मुलगी सांपडली. आपली सेवा करण्याला ही सर्वथैव योग्य होय. ही राजकन्या असून राणीसाहेबांना इचा फार लळा आहे, तरी आपण सामान्य परिचारिकेप्रमाणें हिला मानूं नये. ही सुशील असून विश्वास टाकण्याला पात्र आहे. आपत्काळीं हिचें आपणांस बिनमोल साहाय्य होईल'. हा विलासवतीचा निरोप ऐकून 'मी मातुःश्रींच्या आज्ञेबाहेर नाहीं', असें बोलून चंद्रापीडानें कंचुकीला जावयास सांगितलें.

त्या दिवसापासून पत्रलेखा राजपुत्राच्या सेवेंत सदासर्वकाळ तत्पर राहिली व चंद्रापीडालाहि दिवसेंदिवस ती अधिकाधिक आवडूं लागली.

## प्रकरण ११ वें

## शुकनासाचा चंद्रापीडास उपदेश

पुत्रावर राज्यकारभार सोंपवून आपण वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार करावा असा तारापीडाचा बरेच दिवस मानस होता. आतां आपली इच्छा सफल होण्याचा समय आला आहे असें मनांत येऊन त्यानें यौवराज्याची सिद्धता करण्यास सेवकांना आज्ञा केली; आणि अभिषेक-दिन निश्चित केला. तत्पूर्वी एके दिवशीं चंद्रापीड शुकनासप्रधानाच्या भेटीस गेला असतां, ही संधि साधून शुकनासानें त्याला प्रसं-गोचित असा बहुमोल उपदेश केला. चंद्रापीड विनयशील असतांहि त्याला अधिक विनयशील करावें असा प्रधानाचा हेतु होता. तो म्हणाला, 'चंद्रापीडा, तूं सर्व शास्त्रांचें अध्ययन केलें आहेस, तेव्हां तुला उपदेश करण्याजोगें कांहीं राहिलें आहे असें नाहीं; तथापि मला चार गोष्टी सांगाव्याशा वाटतात म्हणून सांगतों.

गर्भश्रीमंती, तारुण्य, अप्रतिम सौंदर्य व अमानुष शक्ति यांपैकीं एकेक देखील मनुष्यास उन्मत्तपणा आणूं शकतें. मग हीं सर्व एक-वटल्यावर काय विचारावें? चंद्रापीडा, आपलें कल्याण व्हावें अशी तुझी इच्छा आहे; यास्तव प्रथम लक्ष्मीचें वास्तविक स्वरूप लक्षांत आण.

लक्ष्मी ही क्षीरसमुद्रांतून निघाली. तेथून बाहेर पडतांना तिनें आपल्या सख्ख्या भावंडांपासून एकेक गुण उचलला. उच्चैःश्रव्या-पासून चपलता घेतली व कालकूट विषापासून मोह घेतला. ही अमृताची भगिनी असून प्रारंभीं जरी अमृतासारखी गोड वाटली तरी अखेरीस विषासारखी कडू होते. गंगातरंगाप्रमाणें ही चंचल असून विजेसारखी थोडा वेळ चमकणारी आहे. किंबहुना गुणरूप रज्जूंनीं हिला जखडून टाकिलें तरी ही केव्हां गुंगारा देईल याचा नेम नाहीं.

ही कोणाचीच ओळख ठेवीत नाहीं. शूर पुरुषानें हिला तरवारीच्या पिंजऱ्यांत अडकवून ठेविलें तरी तेथूनसुद्धां ती निसटते. ही सौंदर्याला भुलत नाहीं, विद्येला जाणत नाहीं व शास्त्राला भीक घालीत नाहीं. सरस्वतीची ज्याच्यावर कृपा आहे त्याच्याजवळ ही जणूं सवतीमत्सरानें मुळींच कधीं राहात नाहीं. फार काय सांगावें? गुणवानाला जणूं अपवित्र पदार्थ समजून ही स्पर्शसुद्धां करीत नाहीं; एवढेंच नव्हे पण त्याच्या वाऱ्यालाहि उभी राहात नाहीं.

ज्याला लक्ष्मीनें फसविलें नाहीं असा मनुष्य विरळा! हिच्या संसर्गानें नेत्रांस अंधळेपणा येतो, तो कितीहि अंजनें घातलीं तरी नष्ट होत नाहीं. ही द्रव्याचा ऊष्मा उत्पन्न करते तरी पण तिच्या योगानें जाड्य (= मांद्य = शैत्य) येतें. उद्धटपणाची ही पताकाच होय! लक्ष्मी उन्नति करते तरी नीचपणा आणते. हिनें वरलेले राजे कालांतरानें पस्तावतात. त्यांचें ज्ञान, त्यांचा सरळपणा, त्यांची क्षमाशीलता, त्यांचें सत्यवादित्व हीं जणूं अभिषेकजलानें धुवून जातात! मस्तकावर मुकुट धारण केल्यानें, त्याच्या भारानेंच कीं काय, त्यांच्या डोक्यांतील सद्विचार गळून पडतात! अशा राजांना हलकट स्तुतिपाठक घेरतात व त्यायोगें ते राजे पापकर्माला प्रवृत्त होऊन व्यसनांत ठार बुडतात. एखाद्या मरणोन्मुख माणसाप्रमाणें ते आपल्या आप्तबंधूंची ओळख विसरतात. देवांचा अपमान करणें यांत त्यांना मोठेपणा वाटतो. गुरुजनांचा तिरस्कार करणें हाच त्यांना शहाणपणा आहे असें वाटतें; आणि स्वच्छंदानें वागणें हेंच स्वातंत्र्य व हेंच प्रभुत्व होय असें ते मानूं लागतात!

राजांना सदुपदेश करणारे निःस्पृह लोक क्वचित् लाभतात. प्रतिध्वनीप्रमाणें होस हो म्हणणारांची मात्र त्यांच्याभोंवतीं गर्दी असते. सज्जनांचा योग्य उपदेश त्यांना रुचत नाहीं, उलट सज्जनांचा उच्छेद करण्याची त्यांना इच्छा होते. चंद्रापीडा, असे राजे

सर्व जनतेच्या उपहासास पात्र होतात.

युवराजा, शास्त्रपूत झालेली निर्मल बुद्धि देखील तारुण्याच्या भरांत मलिन होते व तरुणाची दिशाभूल करून त्याला ती सन्मार्गापासून भ्रष्ट करते. अशा वेळीं कोणतेंहि शास्त्र त्याला ताळ्यावर आणूं शकत नाहीं. गुरूनीं केलेला उपदेश फुटक्या भांड्यांतील पाण्यासारखा त्याच्या ठिकाणीं पळभरसुद्धां ठरत नाहीं.

चंद्रापीडा, मला जें सांगावेंसें वाटलें तें मीं सांगितलें. तुझे सद्गुण पाहून मला फार संतोष वाटत आहे. तुझ्या हातून तसा कांहीं अविचार होणार नाहीं अशी मला बालंबाल खात्री आहे. मुला, लक्ष्मी चंचल खरी पण ती अविचारी मनुष्याला मात्र उन्माद आणते, सर्वांसच नाहीं. तूं अगोदर स्वभावानें गंभीर आहेस व तुझ्या पित्यानें मोठ्या प्रयत्नानें तुला सुविद्य केलें आहे. तुझ्यासारखे नीतिमान पुरुषच अशा उपदेशाला पात्र होत. स्फटिकमण्यांत चंद्रकिरण प्रतिबिंबित होतात त्याप्रमाणें तुजसारख्यांच्या निर्मळ अंतःकरणांत उपदेशाचा ठसा स्पष्टपणें उमटतो.

गुरूपदेश हा कर्णमधुर व हितकारक असला तरी तो अयोग्य पुरुषाच्या कानांत शूळ उत्पन्न करितो. राजपुत्रा, तुला यौवराज्याभिषेक झाल्यावर ज्या योगानें लोक तुला हसणार नाहींत आणि साधुजन तुझी निंदा करणार नाहींत अशाच प्रकारें वागण्याचा तूं प्रयत्न कर. तुझ्या वडिलांनीं सर्व पृथ्वी जिंकली आहेच. ती पुनः जिंकण्याला जा. दिग्विजय कर. शत्रूंचीं मस्तकें वांकीव; बंधुजनांचीं उन्नत कर. चंद्रापीडा, आपल्या प्रतापानें राजा एकदां उज्वलित झाला कीं, त्याची सर्वत्र मानमान्यता होते.'

शुकनासाच्या या निर्मल उपदेशजलानें अभिषेक झाल्याप्रमाणें चंद्रापीड अधिकच तेजस्वी व प्रहृष्ट दिसूं लागला.

## प्रकरण १४ वें

# यौवराज्याभिषेक

तो सोन्याचा दिवस उगवला! हजारों राजे लोक समारंभाकरितां उपस्थित झाले. उपाध्यायांनीं सर्व साहित्य सिद्ध केलें. समस्त तीर्थांचें, नद्यांचें व समुद्रांचें उदक आणलेलें होतें. विविध औषधी, फलें व रत्नें त्यांत टाकलेलीं होतीं. मंत्रघोष सुरू झाला. तारापीडानें सुवर्णाचें अभिषेकपात्र हातांत धरलें आणि त्यांतील उदकांत स्वतःच्या आनंदाश्रूंची भर घालून पुत्राला अभिषेक केला. अभिषेकधारा सुरू असतांना त्याबरोबर तेथें जमलेल्या सर्व लोकांच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचा वर्षाव चालला होता.

नंतर चंद्रापीडानें ज्योत्स्नेप्रमाणें धवल वस्त्रें धारण केलीं. विलासवतीनें त्याच्या अंगाला चंदनाची उटी लावून मस्तकावर सुवासिक पुष्पांचा तुरा खोवला; पुरोहितानें त्याच्या हातांत कंकण बांधिलें. गळ्यांत तेजस्वी रत्नांचा हार घातला. नंतर तो सभामंडपाकडे चालला. तारापीड स्वतः दंड धरून पुत्राचा पाईक बनला व लोकांची दाटी मोडीत पुढें चालला. मग चंद्र जसा मेरूपर्वतावर चढतो तद्वत् चंद्रापीड सुवर्णमय सिंहासनावर आरूढ झाला. आणि एका वृक्षावर पसरलेली लता जशी जवळच्या दुसऱ्या वृक्षावर जाते, त्याप्रमाणें तारापीडाला न सोडतां राज्यलक्ष्मीनें त्या समयीं राजपुत्राला अलंकृत केलें.

## प्रकरण १५ वें

## दिग्विजय

कांहीं वेळानें मेघगर्जनेसारखा दुंदुभींचा ध्वनि ऐकूं येऊं लागला! दिग्विजयाला निघण्याची ही पूर्वसूचना होती. दुंदुभींच्या प्रतिध्वनीनें सर्व त्रैलोक्य दणाणून टाकलें. पाताळांत शेषाच्या फणा थरथर कापूं लागल्या! स्वर्गांत इंद्राचा ऐरावत मोठ्यानें चीत्कार करूं लागला.

चंद्रापीड सिंहासनावरून उठला, त्याबरोबर शत्रूंच्या राज्यलक्ष्म्याहि आपापल्या सिंहासनावरून उठल्या! सभामंडपांतील लोकहि उठून उभे राहिले; तेव्हां इतकी खेचाखेची व रेटारेटी झाली कीं, कित्येक राजांच्या कंठांतील हार तुटून त्यांतील मौक्तिकें इतस्ततः विखरल्यामुळें दिग्विजयास निघालेल्या युवराजावर ह्या लाह्याच उधळल्या आहेत कीं काय असें भासलें!

सभागृहांतून बाहेर आल्यावर चंद्रापीड पत्रलेखेसह हत्तिणीवर चढून बसला. त्याच्या मुकुटांतील माणकांचे किरण चोहोंकडे पसरले. तेव्हां लोकांना हें समजेना कीं, चंद्रापीडाच्या प्रतापाचें हें तेज आहे कीं शत्रूरूप वनाला दग्ध करणारा हा दावाग्नि आहे!

युवराजाबरोबर जाण्यासाठीं नगराबाहेर इतकें सैन्य गोळा झालें कीं, जिकडे पहावें तिकडे घोडेच घोडे व हत्तीच हत्ती दिसूं लागले. समुद्राच्या प्रचंड लाटांप्रमाणें घोड्यांच्या रांगा धावत चालल्या होत्या. हत्तींच्या गंडस्थळांतील मदोदक रस्त्यानें वाहूं लागलें. त्यांत घोड्यांच्या तोंडांतील फेस पडत असल्यामुळें पायदळांतील सैनिक पाय निसरून पडूं लागले. मदोदकाच्या सुगंधानें दुसऱ्या कशाचाच वास येईनासा झाला! धुरळा तर इतका उडाला कीं, आकाश मेघांनीं अकालीं व्याप्त झाल्याची भ्रांति उत्पन्न झाली.

चंद्रापीडाच्या पुढें इंद्रायुध चालला होता व बरोबर दुसऱ्या हत्ति-

णीवर बसून वैशंपायन चालला होता. तो सभोंवार दृष्टि फेंकीत मित्राला म्हणाला, चंद्रापीडा, तारापीड महाराजांनीं जिंकलें नाहीं असें आतां काय उरलें आहे ? त्यांनीं कोणत्या दिशा जिंकल्या नाहींत, कोणते किल्ले सर केले नाहींत, कोणत्या राजांनीं त्यांच्या पायांची धूळ आपल्या मस्तकावर धारण केली नाहीं, कोणतीं रत्नें मिळविलीं नाहींत कीं तीं तुला मिळवावयाचीं आहेत !

मित्रा, काय हें अफाट सैन्य ! हें काय रसातलांतून वर येत आहे, का त्याला पृथ्वीच प्रसवते आहे, का आकाशच त्याची वरून वृष्टि करीत आहे ! मला वाटतें, हें अपरिमित सैन्य पाहून पृथ्वीला कौरव-पांडवांच्या युद्धाची आठवण होत असेल.

याप्रमाणें ते बोलत बोलत चालले असतां सायंकाळ झाली. म्हणून चंद्रापीडानें एका विश्रामस्थानीं तळ दिला.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं चंद्रापीडानें पुढें कूच केलें. मार्गांत त्यानें उद्धट शत्रूंना नम्र केलें; शरणागतांना अभय दिलें; दुष्टांचा निःपात केला; आश्रमांचें रक्षण केलें; साधूंचा महिमा वाढविला; लोकांची प्रीति संपादिली आणि ठिकठिकाणीं जयस्तंभ उभारले.

अशा प्रकारें प्रथम पूर्वदिशा, मग दक्षिण, पुढें पश्चिम व नंतर उत्तर या क्रमानें त्यानें तीन वर्षांत सारें जग जिंकून करभार मिळविला; आणि पृथ्वीप्रदक्षिणा करीत करीत तो कैलासपर्वतासमीप आला. तेथें हेमकूटालगत सुवर्णपूर नामक एक स्थळ होतें, तें त्यानें जिंकून घेतलें. आणि आपलें सैन्य थकलेलें पाहून तेथेंच त्यानें मुक्काम करण्याचें ठरविलें.

## प्रकरण १६ वें

# महाश्वेतेची भेट

सुवर्णपुरास असतां, चंद्रापीड इंद्रायुधावर बसून एकटाच मृगया-विहार करण्याकरितां गेला. फिरतां फिरतां, हेमकूटावरून खालीं उतरत असलेलें एक किन्नरांचें जोडपें अकल्पित त्याच्या दृष्टीस पडलें. चंद्रापीडानें किन्नर हा प्राणी पूर्वीं कधींच पाहिला नसल्यामुळें त्याला कौतुक वाटून तो गमतीनें किन्नरमिथुनाचा पाठलाग करूं लागला. त्यानें घोडा भरधांव फेकला. पण तें जोडपें बुजून भिऊन दूरदूर पळूं लागलें व पाहतां पाहतां समोरच्या गिरि-शिखरावर दिसेनासें झालें. हें पाहून चंद्रापीड घोड्याला धरून उभा राहिला. आणि अंमळ विचार करून स्वतःशीं म्हणाला, विनाकारण मी आपल्या जिवास इतके श्रम दिले! हें विचित्र जोडपें पकडून मला काय करावयाचें होतें ? भलत्याच कामाचा मी काय हा पोरखेळ आरंभिला आहे ? काय हा नादिष्टपणा ? पित्याच्या आज्ञेप्रमाणें आरंभलेलें कार्य शेवटाला न नेतां, सर्व परिवार सोडून मी कोठच्या कोठें आलों याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें व माझें मलाच हसूं येतें. आतां परत तरी कसें जावें ? रस्ता कोणाला विचारावा ? असो. आपल्या[1] चुकीचें प्रायश्चित्त आपणालाच भोगणें प्राप्त आहे.

मग त्याच्या मनांत विचार आला कीं, इंद्रायुधाला कोठें तरी झऱ्याचें पाणी पाजावें. म्हणून पाणी शोधीत तो इकडे तिकडे फिरूं लागला.

कैलासपर्वताच्या वरच्या बाजूस ईशान्येला चंद्रापीडास एक निबिड व विस्तीर्ण अरण्य दिसलें. तिकडून आलेला जलतुषार-

---

१ आत्मकृतानां हि दोषाणां नियतमनुभाव्यं फलमात्मनैव ।

मिश्रित चंदनासारखा शीतळ व मंद वारा त्याचा श्रमपरिहार करूं लागला. त्या दिशेनें मार्ग आक्रमिल्यावर झाडीच्या मध्यभागीं त्याला एक रम्य सरोवर लागलें. त्याभोंवतीं चंदनाचे वृक्ष असून पाण्यांत हंसादि विविध पक्षी क्रीडा करीत होते. सहस्रावधि शतपत्र कमलें त्यांतील प्रसन्न उदकांत प्रफुल्लित झालीं होतीं. त्यांचा घमघमाट सुटला होता. हें सरोवर त्रैलोक्यलक्ष्मीचा रत्नखचित आरसा आहे, का वरुणाचा आरसेमहाल आहे, का मुनिजनांच्या निर्मल मनांनीं हें बनविलें आहे, का मोत्यांच्या पाण्यांनींच निर्माण केलें आहे, असा त्यास आभास झाला. तेथील अनुपम सृष्टिवैभव पाहून चंद्रापीड मनाशीं म्हणाला, अहाहा ! माझ्या दृष्टीचें आज साफल्य झालें ! किन्नरमिथुन जरी मला सांपडलें नाहीं. तरी त्या निमित्तानें हा मनोहर जलसंचय तरी माझ्या दृष्टीस पडला ! खरोखर या सरोवराच्या लोभानेंच भगवान शंकर याच्या समीप कैलासावर राहात असले पाहिजेत. येथील अमृतासारखें मधुर उदक सोडून भगवान विष्णु त्या खारट समुद्रांत कां निद्रा करीत आहेत कोण जाणे ?

चंद्रापीड घोड्यावरून खालीं उतरला आणि प्रथम त्यानें इंद्रायुधास यथेच्छ पाणी पाजलें; व तीरावरील हरळी तलवारीनें तोडून त्याच्यापुढें टाकली. मग स्वतः उदकाचें प्राशन करून जवळच्या वृक्षमंडपांत एका विस्तीर्ण शिळेवर कमलपत्रें पसरून तो स्वस्थ हुश् हुश् करीत विश्रांति घेत पडला. पण तो अंग टेंकतो न टेंकतो तोंच उत्तरेच्या बाजूकडून आलेला मधुर गायनाचा स्वर त्याच्या कानीं पडला. क्षणभर त्याची वृत्ति तल्लीन झाली. इंद्रायुध गवत खाण्याचें सोडून मान वर करून स्तिमित उभा राहिला. हा श्रुति-मनोहर आलाप कोठून येतो याचा सुगावा काढावा या हेतूनेंच चंद्रा-पीड इंद्रायुधावर बसून त्या रोंखानें निघाला. नादलुब्ध हरणें तिकडे

धावत चाललीं होतीं तीं जणूं चंद्रापीडाला मार्ग दाखवूं लागलीं.

त्या ध्वनीच्या धोरणाधोरणानें जातां जातां त्यानें महादेवाचें एक शुभ्र मंदिर पाहिलें. घोड्यावरून उतरून तो आंत गेला. तेथें चतुर्मुख त्र्यंबकाच्या मूर्तीसमोर स्तवन करीत बसलेली एक प्रौढ कन्या त्याच्या दृष्टीस पडली. तिचें वय सुमारें अठरा वर्षांचें असावें. तिची प्रशांत व गंभीर वृत्ति आणि पवित्र कांति पाहून चंद्रापीडाला अत्यंत विस्मय वाटला. तिच्या अंगास शुभ्र भस्म लावलेलें असून गळ्यांत मौक्तिकांची जपमाळ होती; आणि मांडीवर वीणा ठेवून त्याच्या सुरावर ती गात होती.

मंडपांत एका खांबाशीं उभा राहून तो तिचें गायन संपण्याची वाट पाहात राहिला. या[1] जगांत अशा किती तरी अतर्क्य गोष्टी पाहाण्यांत येतात कीं, ज्यांची नुसती कल्पनासुद्धां करवत नाहीं! असे विचार त्याच्या मनांत वरचेवर येत होते.

गायन संपल्यावर त्या स्त्रीनें शिवाला प्रदक्षिणा घातल्या मग ती सभामंडपांत आली. तेथें उभा असलेल्या चंद्रापीडाला पाहून ती आदरपूर्वक म्हणाली, "अतिथीचें स्वागत असो.अशा या थोर पुरुषांचें इकडे येणें कशाकरितां झालें असेल तें असो. आपणांस माझी अशी विनंती आहे कीं, आपण मजबरोबर येऊन अतिथिसत्कार स्वीकारावा." 'हा मजवर अनुग्रह आहे' असें बोलून चंद्रापीड तिच्या पाठीमागून लीनतेनें चालला. जवळजवळ शंभर पावलें चालल्यावर तीं दोघें बर्फानें आच्छादित अशा गुहेसमीप आलीं. आंत जाऊन त्या स्त्रीनें अतिथीस अर्घ्य देण्याकरितां द्रोणांतून पाणी आणिलें. तेव्हां चंद्रापीडानें म्हटलें, एवढा सत्कार कशास हवा? आपलें दर्शनच पापक्षालन करण्याला समर्थ आहे. पण त्या स्त्रीचा फारच आग्रह पडल्यावरून त्यानें नम्रतेनें तिच्या पूजेचा स्वीकार केला व

---

१ अहो जगति जन्तूनां असमर्थितोपनतानि आपतन्ति वृत्तान्तान्तराणि।

तिनें आणून दिलेलीं अमृतासारखीं गोड फळें ग्रहण केलीं.

नंतर त्या युवतीनें विचारल्यावरून चंद्रापीडानें दिग्विजयापासून आरंभ करून तेथें येईपर्यंतचें संपूर्ण वृत्त कथन केलें. तो म्हणाला, "'दोघांचें' थोडा वेळ जरी एके ठिकाणीं राहणें झालें तरी तेवढ्यानें परिचय होतो. तरी आपणांला कांहीं अडचण वाटत नसेल तर आपण आपलें सर्व वर्तमान निवेदन करून मजवर अनुग्रह करावा. आपलें नाजुक व कुसुम कोमल वय कोणीकडे आणि हें कठोर तपाचरण कोणीकडे! तारुण्याच्या भरांत असें व्रत आचरण्याचें कारण काय? मला हा सर्व विलक्षण प्रकार वाटतो. तरी माझें आश्चर्य दूर करावें."

असें चंद्रापीडाचें भाषण ऐकून, ती स्त्री लांब व दीर्घ उसासा टाकून स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. तिच्या गौर गालांवरून अश्रुबिंदु खालीं टप्टप् पडूं लागले. जणूं काय तुटलेल्या हारांतून मोत्येंच मोत्यें गळून पडत होतीं. तें पाहून 'मी आपल्या दुःखस्मरणाला कारण झालों, या अपराधाची मला क्षमा करावी' असें बोलून चंद्रापीडानें बाहेर जाऊन ओंजळींत झऱ्याचें पाणी आणिलें. तेव्हां त्याच्या आग्रहावरून तिनें तोंड धुतलें; आणि वल्कलानें डोळे पुशीत पुंशीत ती म्हणाली, महाराज, या पापिणीची चरित्रकथा ऐकून काय करावयाचें आहे? तथापि आपणांस फारच उत्कंठा वाटत असेल तर सांगतें.

माझें नांव महाश्वेता. मी अप्सरा आहे. गंधर्वकुळांत हंस व गौरी या थोर मातापितरांच्या उदरीं मी जन्मास आलें. मला कोणी दुसरें तिसरें भावंड नसल्यामुळें त्यांनीं माझें परोपरीनें कोडकौतुक केलें. याप्रमाणें कुलवृत्तांत कथन केल्यावर तिनें आपली व पुंडरीकाची भेट कशी झाली, पुढें त्याचा व आपला आकस्मिक वियोग

---

१. स्वल्पाप्येकदेशावस्थानकालकला परिचयमुत्पादयति ।

कसा झाला, नंतर प्रत्यक्ष चंद्रानें येऊन त्याचा देह चंद्रलोकीं कसा नेला, आश्वासन काय दिलें व आपण प्राणत्याग करण्याला उद्युक्त झालों असतां जोगिणीच्या वृत्तीचा अंगिकार करून तरलिका दासी-सह येथेंच कशाकरितां निवास केला इत्यादि करुण कहाणी हृदय-द्रावक शब्दांनीं वर्णिली. मधून मधून महाश्वेता वल्कलाच्या पदरानें आपलें मुख झांकून अश्रू ढाळीत होतीच. पण शेवटीं तिला एवढा वेगाचा हुंदका आला कीं, ती गळा काढून रडूं लागली.

चंद्रापीडाच्या हृदयाचें पाणी पाणी झालें! अगोदरच महाश्वेतेचा विनय व दाक्षिण्य पाहून त्याच्या मनांत तिजविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झाली होती; त्यांतून तिनें मोकळ्या मनानें आत्मवृत्त सांगितल्यावर तर त्याला तिच्याविषयीं अधिकच कळवळा व सहानुभूति वाटूं लागली. तेव्हां तिचें सांत्वन करून तिला धीर द्यावा या हेतूनें तो म्हणाला :

"हे महाभागे महाश्वेते, तुला एवढें वाईट वाटण्याचें कारण नाहीं; इतर लोक निष्फळ अश्रू गाळून आपला स्नेह व्यक्त करतात, परंतु तुझी कृतीसुद्धां प्रेमाला उचित अशीच आहे. किंबहुना, सर्व ऐश्वर्य, सुख व आप्तमित्र यांचा त्याग करून स्त्रियांस कष्टकारक अशा व्रताचें तूं आचरण करीत आहेस. यापुढें सहगमनाची तरी काय विशेष महती?

मी तर म्हणतों, सहगमन[1] करणें हा निवळ वेडेपणा आहे. हें अज्ञानाचें व साहसाचें कर्म होय. आणि वास्तविक पाहातां आपणांला शोकवेदना सहन होत नाहींत म्हणूनच आपण प्राण-परित्याग करितों. त्यापासून मेलेल्या मनुष्याला कांहींच लाभ होत नाहीं. सहगमनामुळें मृत झालेला प्राणी जिवंत होत नाहीं, किंवा त्याचें पुण्य वाढत नाहीं; त्याला सद्गति प्राप्त होत नाहीं, किंवा तो

१ यदेतदनुमरणं नाम तदतिनिष्फलम्।

नरकांत पडत असला तर त्यापासून मुक्त होत नाहीं. त्याला त्याच्या कर्मानुरूप कोठें तरी जन्म घ्यावा लागतोच. आपल्याला मात्र धड स्वहित नाहीं व परहित नाहीं; केवळ आत्महत्येचें पातक लागतें! तसेंच आपण जिवंत असलों तर तिलांजलि देऊन आपलें व मृत माणसाचें हित करून घेऊं; आणि आपणच मेलों तर दोघांचेंहि हित आटोपलेंच! शिवाय, महाश्वेते, पूर्वीं कोणी स्त्रिया वैधव्यदशेंत राहिल्या नाहींत असें का तुला वाटतें? पंडुराजा ऋषीच्या शापानें मृत झाला असतां पतिव्रता कुंती सती गेली नाहीं; अभिमन्यु युद्धांत मरण पावला असतां उत्तरेनें देहत्याग केला नाहीं; जयद्रथास अर्जुनानें परलोकीं पाठविलें त्या वेळीं दुःशीलेनेंहि जीविताचा त्याग केला नाहीं.

महाश्वेते, [1]दैवाचा प्रभाव विलक्षण आहे. तथापि धीर[2] पुरुष धैर्यानें संकटें तरून जातात. त्यांतून तुला तर दिव्य पुरुषानें आश्वासन दिलें आहे. तें खरें झालेंच पाहिजे. भगवान श्रीकृष्णानें सांदीपनीचा मृत पुत्र यमपुरीहून आणून गुरूला अर्पिला हें तुला विदित नाहीं काय? तेव्हां तुझा व पुंडरीकाचा समागम होईल यांत मुळींच संदेह नाहीं. [3]महात्म्यांना अशक्य असें काय आहे? बरें पण, महाश्वेते, ती तुझी वनवासांतील मैत्रीण तरलिका कोठें आहे?"

"मीं तिला कादंबरीकडे पाठविलें आहे."

"ही कादंबरी कोण?"

"चित्ररथ गंधर्वाची कन्या. तिचा आणि माझा लहानपणापासून अतिशय स्नेह. माझा असा हा वृत्तांत ऐकून तिनें सखीजनांसमक्ष शपथ वाहून असा निश्चय केला कीं, महाश्वेता दुःखांत आहे तों-

---

१ प्रभवति हि भगवान्विधिः।

२ धीरा हि तरन्त्यापदम्।

३ अचिन्त्यो हि महात्मनां प्रभावः।

पर्यंत मी पाणिग्रहण करणार नाहीं; आणि यदाकदाचित् माझ्या इच्छेविरुद्ध गोष्ट घडून आली तर मी गळफांस लावून किंवा विष-भक्षण करून प्राणत्याग करीन. पुढें कांहीं केल्या ती आपला हट्ट सोडीना; असें पाहून तिच्या मातापितरांनीं मला सांगून पाठविलें कीं, 'वत्से महाश्वेते, तूं तरी येऊन कादंबरीला दोन गोष्टी सांग, व तिची समजूत पडली तर पाहा.' म्हणून या कामगिरीवर तरलिकेला मीं तिकडे पाठविलें आहे. तिच्याबरोबर कादंबरीला मीं असा निरोप धाडला आहे कीं, 'हे प्रियसखि, आपल्या मातापितरांना दुःख देऊं नकोस. मी जिंवंत राहावें असें तुला वाटत असेल तर वडील माणसांच्या आज्ञेप्रमाणें वाग."

एवढें बोलून महाश्वेता उगीच बसली. इतक्यांत चंद्रोदय झाला. महाश्वेतेला झोप लागली हें पाहून चंद्रापीडानेंहि पल्लवशय्येवर अंग टाकलें. या वेळीं, प्रिय मित्र वैशंपायन व पत्रलेखा आपणाविषयीं काळजी करीत असतील, सैनिकांसहि चिंता वाटूं लागली असेल, अशा प्रकारचे विचार मनांत येत असतां तो निद्रावश झाला.

## प्रकरण १७ वें

# कादंबरी व चंद्रापीड

दिवस उगवतांच गंधर्वकुमार केयूरक याला बरोबर घेऊन तरलिका महाश्वेतेच्या आश्रमाला परत आली. तिला पाहतांच महाश्वेतेनें विचारलें, कादंबरी खुशाल आहेना ? माझा निरोप तिला सांगितलास का ? 'त्या खुशाल आहेत' असें तरलिकेनें उत्तर दिलें व ती आणखी म्हणाली कीं, आपला निरोप ऐकल्यावर त्यांनीं जो उलट निरोप पाठविला आहे तो त्यांचाच वीणावाहक हा केयूरक सांगेल.

तेव्हां केयूरक म्हणाला, 'महाश्वेते, देवी कादंबरीची अशी विनंती आहे कीं, तरलिकेबरोबर तूं जो निरोप पाठविलास तो वडिलांचा मान राखण्याकरितां का माझ्या मनाची परीक्षा पाहण्याकरितां ? तूंच पाहा; माझी प्रियसखी प्रियविरहानें दुःखित झाली असतां लग्न करून सुखांत राहण्याची मला इच्छा होईल काय ? महाश्वेते, तुझ्या स्नेहास्तवच मी वडील माणसांची मर्जी मोडली.'

यावर महाश्वेता म्हणाली, 'बरें तर, केयूरका, मी स्वतःच भेटीला येत आहें असें कादंबरीला जाऊन सांग. हो पुढें, मी मागाहून येतें.'

केयूरक निघून गेल्यावर महाश्वेता चंद्रापीडाला म्हणाली, 'महाराज, आपण मजबरोबर गंधर्वलोकाला यावें अशी माझी प्रबल इच्छा आहे. तेथें आपणाला कादंबरीची भेट होईल. शिवाय तो प्रदेश नितान्त रमणीय व चित्तवेधक आहे. जर आपल्या कामाची खोटी होत नसेल किंवा आपणाला येण्याचे श्रम वाटणार नसतील तर आपण माझ्या विनंतीला मान द्यावा. सज्जनांचा[१] समागम दुःखित जनांचें देखील मन रमवितो. कादंबरीची समजूत घालून उदईक सकाळीं परत फिरावें असा माझा बेत आहे.'

---

१ दुःखितमपि जनं रमयन्ति सज्जनसमागमाः ।

'महाश्वेते, तुझें दर्शन झाल्यापासून मी तुझाच झालों आहे; यास्तव तुझी आज्ञा मला मान्य आहे.' असें बोलून चंद्रापीड महाश्वेतेबरोबर पायींच जावयास निघाला. इंद्रायुधाला त्यानें तेथेंच ठेविलें.

थोड्याच वेळांत, तीं दोघें सुवर्णतोरणांनीं सुशोभित केलेल्या चित्ररथ गंधर्वाच्या भव्य प्रासादाजवळ येऊन पोंचलीं, आणि सात चौक ओलांडून थेट कन्याजनांच्या अंतःपुरांत शिरलीं. त्या ठिकाणीं कादंबरी पलंगावर बसलेली असून तिची कांति चोहोंकडे झळकत होती. तिच्यासमोर केयूरक बसला होता. महाश्वेतेच्या आश्रमांत कोण पाहुणा आला आहे? त्याचें वय किती आहे? तो काय बोलत होता? अशा प्रकारचे खोदून खोदून अनेक प्रश्न त्या वेळीं कादंबरी त्याला विचारीत होती.

महाश्वेतेबरोबर आलेल्या पुरुषाची दृष्टादृष्ट होतांच,केयूरकानें वर्णिलेला हाच तेजस्वी पुरुष असावा असें त्याच्या सौंदर्यावरून कादंबरीच्या तेव्हांच लक्ष्यांत आलें. तत्काळ तिची वृत्ति उल्लसित झाली. पलंगावरून उठून, "प्रियसखि महाश्वेते, ये, ये, फार दिवसांनीं तुझी गांठ पडली' असें म्हणून तिनें महाश्वेतेला मिठी मारली. मग चंद्रापीडाकडे बोट करून कादंबरीला महाश्वेता म्हणाली, 'भरतखंडाचे राजे तारापीड महाराज यांचे हे पुत्र चंद्रापीड महाराज. दिग्विजयाच्या निमित्तानें यांचें या प्रदेशीं येणें झालें. यांचें दर्शन झाल्यापासून हे मला आप्तासारखे वाटतात. तेव्हां तूंहि परकेपणा सोडून जसा माझा तसा यांचाहि आदरसत्कार कर.'

या प्रकारें उभ्याउभ्याच महाश्वेता चंद्रापीडाची ओळख करून देत असतां कादंबरी सलज्ज होऊन मधून मधून सानंद स्मित करीत चंद्रापीडाकडे पाहात होती. चंद्रापीडालाहि वाटलें कीं, ब्रह्मदेवानें माझीं सर्व इंद्रियें नेत्रमय केलीं असतीं तर बरें होतें. 'ही मी आपणांस नमस्कार करतें,' असें म्हणून मग कादंबरीनें चंद्रापीडाला

प्रणाम केला आणि सुवर्णासनावर बसण्यास त्याला विनंति केली.

इतक्यांत एक दूत येऊन सांगूं लागला कीं, चित्ररथमहाराज व मदिरादेवी महाश्वेतेला भेटण्यास बोलावीत आहेत. त्याप्रमाणें तिकटे जातांना महाश्वेतेनें कादंबरीच्या संमतीनें जवळच असलेल्या क्रीडापर्वतावरील आरसेमहालांत चंद्रापीडाची उतरण्याची व्यवस्था केली आणि केयूरकाला त्याच्या तैनातीस ठेविलें.

चंद्रापीड आरसेमहालांत जाऊन बसला. गंधर्वकन्या गायन-वादनांनीं त्याचें रंजन करूं लागल्या. पण त्याचें कोठें तिकडे लक्ष्य होतें? तें लागलें होतें कादंबरीकडे !

इकडे कादंबरीचीहि तशीच अवस्था झाली होती. तिला अगदीं चैन पडेनासें झालें. तिनें आपल्या प्रेमाची खूण म्हणून एक मुक्ता-हार देऊन मदलेखा दासीला चंद्रापीडाकडे पाठविलें. मदलेखा म्हणजे कादंबरीचा जीव कीं प्राण ! ती आरसेमहालांत येऊन चंद्रापीडाला म्हणाली,

'महाराज, आमच्या हातून आपला व्हावा तसा आदरसत्कार झाला नाहीं म्हणून कादंबरीबाईसाहेबांस फार खेद होत आहे. त्यांनीं हा हार आपल्याकरितां दिला आहे. याच्या मिषानें त्या आपले प्राण महाराजांस अर्पीत आहेत. आपल्या दर्शनानें जिवाचें सार्थक झालें असें त्यांना वाटतें;' असें बोलून मदलेखेनें चंद्रप्रकाशास दिपवून टाकणारा तो शेषनामक हार चंद्रापीडाच्या गळ्यांत घातला.

चंद्रापीडास आनंदाचें भरतें आलें. तो म्हणाला, 'मदलेखे, तूं मोठी चतुर आहेस. प्रेमळ व उदार अंतःकरणाच्या कादंबरीचा अनुग्रह कोणास वश करणार नाहीं? तिनें आपल्या सौजन्यानें मला आपला दास केलें आहे.' असें बोलून त्यानें मदलेखेस निरोप दिला.

त्या रात्रीं तेथेंच राहून प्रातःकाळीं महाश्वेता व कादंबरी यांचा निरोप घेण्याकरितां चंद्रापीड त्यांच्या मंदिरांत गेला. त्याचा अभिप्राय

जाणून महाश्वेता कादंबरीला म्हणाली, "सखे, जसा चंद्रकांत मणि चंद्रिकेनें पाझरतो, त्याप्रमाणें चंद्रापीड महाराज तुझ्या गुणानें द्रवले आहेत. ते बोलण्यास देखील समर्थ नाहींत. त्यांना परत जाणें अवश्य आहे; तरी त्यांना जाण्यास अनुमति दे. तुम्ही एकमेकांपासून दूर झालां तरी कुमुदिनी व चंद्र यांचें जसें परस्परांवर प्रेम असतें तसें तुमचें चिरकाल राहो."

कादंबरी म्हणाली, 'सखे महाश्वेते, हा देह महाराजांच्या स्वाधीनच आहे तर हा त्यांना प्रतिबंध कसा करील?' असें बोलून तिनें केयूरकाला बोलावून आणिलें आणि चंद्रापीडाला स्वस्थानीं पोंचविण्यास त्याला सांगितलें. केयूरकानें घोडा आणला. त्यावर बसून चंद्रापीड जाऊं लागला. त्या वेळीं कादंबरी आपल्या नेत्रांनीं त्याच्यावरील प्रेम हृदयांत साठवीत आहेसें दिसलें.

इकडे चंद्रपीडाचें सैन्य त्याचा शोध करण्यासाठीं इंद्रायुधाच्या खुरांचा माग काढीत काढीत अच्छोद सरोवराजवळच येऊन उतरलें होतें. दोन दिवसांच्या वियोगानंतर राजपुत्र भेटलेला पाहून सैनिकांनीं त्याचा हर्षानें जयजयकार केला.

दुसऱ्या दिवशीं वैशंपायनाजवळ चंद्रापीड गंधर्वनगरीच्या वैभवाचें वर्णन करीत असतां अकस्मात् तेथें केयूरक आला व म्हणाला, "महाराज, शेषनामक आपला हार गंधर्वनगरींत विसरून राहिला होता, तो मीं आणला आहे. तसेंच महाश्वेतेचा आपणांस असा निरोप आहे कीं, आपण गेल्यापासून कादंबरीचें मन वेडावून गेलें आहे; याकरितां फिरून एकवार येथें येऊन आम्हां सर्वांस आनंदित करावें."

चंद्रापीडाला तेंच हवें होतें. क्षणभरहि विलंब न लावतां आपल्या पाठीमागें पत्रलेखेस घेऊन तो इंद्रायुधावर आरूढ झाला. केयूरक त्यास मार्ग दाखवूं लागला.

इकडे कादंबरी हिमगृहांत जाऊन आतुरतेनें चंद्रापीडाची वाट पाहात बसली, तों चंद्रापीड तेथेंच येऊन उतरला. केयूरक घाई-घाईनें आंत गेला व म्हणाला, 'चंद्रापीड महाराजांच्या अत्यंत प्रीतींतली दासी आमच्याबरोबर आली आहे. तिचें नांव पत्रलेखा.' तिला पाहतांच 'मानवी सौंदर्य निर्माण करण्यांत काय हा ब्रह्मदेवाचा पक्षपात !' असे आश्चर्योद्गार कादंबरी पुटपुटूं लागली; तोंच पत्र-लेखेनें तिला नमस्कार केला. तेव्हां 'ये बाई ! अशी इकडे बैस,' असें म्हणून कादंबरीनें तिला आपल्या पाठीशीं बसवून घेतलें. सर्व दासी तिजकडे विस्मयानें पाहात राहिल्या.

चंद्रापीडाचे आगतस्वागत वगैरे उपचार झाल्यावर तो बराच वेळ त्या ठिकाणीं गप्पागोष्टी करीत बसला. कादंबरी कांहींएक न बोलतां लाजत लाजत खालीं तोंड घालून मधून मधून सस्मित दृष्टीनें त्याच्याकडे पाहात बसली होती, पण तिच्या मनांत होतीं तींच उत्तरें मदलेखा देत होती. यामुळें कादंबरीला आनंदाच्या उकळ्या येत होत्या.

नंतर महाश्वेतेचा निरोप घेऊन चंद्रापीड परत जावयास निघाला. कादंबरीच्या आग्रहावरून त्यानें पत्रलेखेस कांहीं दिवस तेथेंच राहावयास सांगितलें. 'पत्रलेखेवर कादंबरीची एवढी प्रीति जडली आहे तेव्हां तिचें भाग्य थोर होय' असें बोलून त्यानें घोड्यास टांच मारली व हां हां म्हणतां तो आपल्या शिबिरांत येऊन पोंचला. तो तेथें यायला आणि तारापीडाकडून एक वार्ताहर यायला एकच गांठ पडली. वार्ताहरानें चंद्रापीडाच्या हातांत एक लखोटा दिला. त्यांत असा मजकूर होता कीं, 'पत्रदर्शनीं निघून यावें. तुला जाऊन तीन वर्षें झालीं. आम्ही उभयतां तुझ्या भेटीकरितां फार उत्कंठित झालों आहोंत'.

वडिलांची आज्ञा शिरसा मान्य करून, चंद्रापीड घोड्यावरून खालीं न उतरतां, थोडे परिजन बरोबर घेऊन तसाच निघाला.

जातेवेळीं तो वैशंपायनास म्हणाला, 'मित्रा, सर्व सैन्याला संभाळून घेऊन ये. मी पुढें जातों.' तसेंच त्यानें मेघनाद सेनापतीस सांगितलें कीं, "तूं पत्रलेखेस घेऊन ये, केयूरक तिला येथपर्यंत आणून पोंचवील. त्याजबरोबर कादंबरीला सांगून पाठीव कीं, मला वडिलांची आज्ञा मोडतां येत नाहीं, म्हणूनच मी आज उज्जयिनीस जात आहें; फिरून देवीचें दर्शन घेण्यास आल्याशिवाय मी राहाणार नाहीं."

---

## प्रकरण १८ वें.

## चंद्रापीड उज्जयिनीस परत येतो.

इंद्रायुध चालूं लागला. जातां जातां विंध्यपर्वताच्या उतरणीवर चंद्रापीडास एक भयंकर अरण्य लागलें. तेथें एक भिल्ल लोकांचें देवीचें मंदिर होतें. त्यावर तांबडा ध्वज फडफडत असून घंटांचा घणघणाट चालला होता. दरवाजाला हस्तिदंती कवाडें होतीं; समोरच्या ओट्यावर लोखंडाचा रेडा उभा होता. त्याच्या अंगावर रक्तचंदनाचे डाग पडलेले होते. त्यावरून रेड्याचा स्वामी यमराज यानें रक्तानें भरलेल्या हातानें त्याची पाठच थोपटली आहे कीं काय असें पाहणारास वाटे. देवळाच्या आवारांत पुष्कळ रक्त सांचलेलें असून जवळच लांबलांब दाढीचे बोकड बांधलेले होते. ते जसे कांहीं जटाधारी तपस्व्यांप्रमाणें दिसत होते.

देवी चंडिकेनें रक्तवस्त्र परिधान केलें असून तिच्या कंठांत मुंडमाळा रुळत होती. भिल्लांच्या स्त्रियांनीं तिला शेंदराचा मळवट भरला होता. तिचे ओठहि तांबडेलाल दिसत होते.

गाभाऱ्यांत एक वृद्ध द्रविड ब्राह्मण देवीचें भजन करीत होता.

त्याची शरीरयष्टिहि जळून काळ्याकुट्ट झालेल्या झाडाच्या सोटा-प्रमाणें दिसत होती. त्याच्या सर्वांगावर देवीचे वण असून हीं अक्का-बाईचीं स्थानेंच आहेत असें पाहणारास वाटे. त्याचा एक डोळा गेलेला होता, पोट सुटलेलें होतें आणि देवीच्या पायां पडपडून त्याच्या टाळक्यास टेंगळें आलीं होतीं. तो मान हलवीत हलवीत, तंबोरी वाजवून खड्या सुरांत गात गात तांडवनृत्य करीत होता.

त्या वृद्ध द्रविड ब्राह्मणाला पाहून चंद्रापीडाला अनावर हसूं कोसळलें. तें इतकें कीं हंसतां हंसतां त्याची मुरकुंडी वळली. ‘आपलें नांव काय? कोठले राहणार? ही वृत्ति अंगिकारण्यास काय कारण झालें?’ इत्यादि प्रश्न चंद्रापीडानें त्याला विचारले, तेव्हां त्यानें आपल्या शौर्याचें, वैभवाचें व रूपाचें असें कांहीं तिखटमीठ लावून रसभरित वर्णन केलें कीं, यंव! त्यापासून चंद्रापीडाच्या विरहाकुल अंतःकरणाची बरीच करमणूक झाली. तिचा मोबदला म्हणून कीं काय त्यानें द्रविड ब्राह्मणाला विपुल द्रव्य देऊन त्याची संभावना केली.

नंतर चंद्रापीड त्या ठिकाणाहून निघाला तो कोठेंहि वाजवीपेक्षां अधिक वेळ न थांबतां उज्जयिनीच्या वेशीपर्यंत आला. ही वार्ता तारापीडास लागतांच तो हर्षनिर्भर होऊन पायींच त्याला सामोरा गेला. पौरजनांना आनंद झाला. ‘राजपुत्राला मी आधीं नमस्कार करीन, मी आधीं नमस्कार करीन’ अशी त्यांच्यामध्यें अहमहमिका लागली; आणि या प्रकारें सर्व लोकांनीं दिग्विजयाहून परत आलेल्या युवराजाचा ठिकठिकाणीं सन्मान करून त्याचें प्रेमपूर्वक स्वागत केलें.

## प्रकरण १९ वें

# पत्रलेखा परत आली

चंद्रापीडाचा देह मात्र उज्जयिनीस येऊन पोंचला पण त्याचं चित्त मागेंच कोठेंतरी घुटमळत होतें. कादंबरीविना सर्व व्यर्थ आहे असें त्याला वाटूं लागलें. तिजकडील वर्तमान ऐकण्याविषयं तो एक दिवस उत्सुक होऊन बसला असतां पत्रलेखेस घेऊन मेघनाद तेथें आला. मग काय विचारतां ? पत्रलेखा अगोदर त्याची आवडती दासी. त्यांत ती कादंबरीकडून निरोप घेऊन आलेली तेव्हां तिला पाहून चंद्रापीडास परामावधीचा आनंद झाला. त्यानं तिचा सत्कार करून तिला उतावीळपणें विचारलें, 'मी इकडे आल्यावर मागें काय काय झालें ?' पत्रलेखेनें सर्व वृत्त सांगून म्हटलें, "कादंबरीबाईसाहेबांस जळीं स्थळीं, काष्ठीं पाषाणीं, बोलतां चालतां, खातांपितां, सर्व ठिकाणीं, आपलें रूप व आपले गुण दिसत आहेत. 'हां मी चंद्रापीड महाराजांस घेऊन आलेंच समजा,' असें मीं म्हटल्यावरच त्यांनीं मला जाण्यास अनुमति दिली. मी निघतांना त्या म्हणाल्या, 'पत्रलेखे, तुजबरोबर निरोप तरी काय पाठवावा, तोच मेला मला सुचत नाहीं.' महाराज, कादंबरीदेवीस आपण दूर केलें, हें आपल्या दयाळू स्वभावास शोभतें का ?"

कादंबरीची अशी अवस्था ऐकून धीरगंभीर स्वभावाचा चंद्रापीड अत्यंत व्याकुळ झाला. जिच्या नेत्रांतून गंगायमुना वाहात आहेत असें कादंबरीचें मुखकमल त्याला डोळ्यांसमोर दिसूं लागलें. पत्रलेखेनें दिलेल्या दोषांस आपण सर्वथा पात्र आहोंत असेंहि त्याच्या मनाला वाटूं लागलें. तो म्हणाला, "पत्रलेखे, त्या वेळीं व्यामोह करणारा कोणाचा तरी शाप मला बाधला असावा, त्याखेरीज माझ्या हातून असें कदापिही झालें नसतें. कांहीं असो, दैवदुर्विपाकानें

माझ्याकडून ही चूक झाली खरी; आतां देवीनें मला निष्ठुर समजूं नये अशाकरितां मी आपली शिकस्त करीन; वेळीं प्राणाचीहि पर्वा करणार नाहीं."

इतक्यांत विलासवतीचा निरोप आला कीं, "चंद्रापीडा, पत्र-लेखा परत आल्याचें ऐकतें, तरी तिला घेऊन लवकर मजकडे ये." चंद्रापीडाच्या मनांत आलें, "काय करावें? माझा जीव संशयांत हेलकावे खात आहे. इकडे मी क्षणभर दृष्टीस पडलों नाहीं तर माझीं मातापितरें कासावीस होतात, तर तिकडे पत्रलेखेच्या मुखानें देवीचें प्रेम मला ओढीत आहे. इकडे सर्व प्रजाजन मजवर निस्सीम प्रेम करतात तर मी तिकडे गंधर्वराजकन्येवर अनुरक्त झालों आहे. मला प्रिय जन्मभूमि तर सोडावीशी वाटत नाहीं आणि प्रियतमा तर जवळ करावीशी वाटते."

याप्रमाणें चिंतन करीत तो पत्रलेखेचा हात धरून मातुःश्रीकडे गेला. आपली अशा तऱ्हेची अवस्था त्यानें कोणाच्याहि दृष्टीस पडूं दिली नाहीं. यद्यपि त्यानें क्रीडाविनोदादि करमणुकीच्या विषयांचा त्याग केला होता तथापि शिष्टाचाराचा केला नव्हता.

## प्रकरण १० वें

# केयूरक कशाला आला?

पुढें एके दिवशीं चंद्रापीड शिप्रा नदीकडे फिरावयास गेला असतां, समोरून कोणी घोडेस्वार वेगानें येत आहे असें त्याला दिसलें. तेव्हां त्या दिशेकडे बोट करून तो पत्रलेखेस म्हणाला, 'तो बघ केयूरक; ऊन्ह लागूं नये म्हणून त्यानें मोरांच्या पिसांची छत्री डोक्यावर धरली आहे. तिच्यामुळें त्याचें तोंड नीटसें दिसत नाहीं.' असें तो बोलत आहे तोंच केयूरक समीप येऊन ठेपला. चंद्रापीडानें दुरूनच त्याला विचारलें, 'सर्व खुशाल आहेत ना? कादंबरीचा किंवा महाश्वेतेचा मला कांहीं निरोप—

"महाराज, मी काय सांगूं? मजबरोबर कोणीं कांहींच निरोप पाठविला नाहीं. पत्रलेखेला मेघनादाच्या स्वाधीन करून मी हेम-कूटाला परत गेलों आणि चंद्रापीडमहाराज उज्जयिनीला गेले असें महाश्वेता व कादंबरी यांना सांगितलें मात्र तों लगेच महाश्वेतेनें उष्ण व दीर्घ सुस्कारा टाकला आणि वर पाहून ती उद्गारली, 'आँ! असें झालें काय! तर मग मी तरी येथें कशाला राहूं?' असें बोलून ती तपश्चर्या करण्याला आपल्या उटजाला निघून गेली.

कादंबरीची दशा तर विचारूंच नका. मस्तकावर लोखंडी घणानें प्रहार केल्यासारखी होऊन ती मूर्च्छितच झाली. महाश्वेता गेल्याचेंहि तिला समजलें नाहीं.

बराच वेळ गेल्यावर तिनें आपले नेत्र उघडले व अश्रुपूर्ण नय-नांनीं ती मजकडे टक लावून पाहात राहिली. तोंडानें जरी तिनें कांहीं सांगितलें नाहीं तरी महाराजांकडे मी जावें असें देवीच्या मनांत आहे असें मीं ताडलें व तिला न विचारतांच मी इकडे आलों. महाराज कृपा करतील तरच देवीचें जीवित राहणार आहे."

चंद्रापीड खिन्न स्वरानें म्हणाला, 'केयूरका, आपण जाऊं तोंपर्यंत देवीच्या जिवांत जीव राहील ना ? घातकी दैवानें किती अघटित घटना घडवून आणली आहे पाहा ! यांत त्याचा कांहींतरी हेतू असला पाहिजे; नाहीं तर मी विनाकारण किन्नरयुगलाच्या पाठीमागें कशाला लागलों असतो ? महाश्वेता कशाला दृष्टीस पडली असती ? तिच्याबरोबर गंधर्वलोकीं माझें कां जाणें झालें असतें ? तेथें देवीचें दर्शन होऊन वडिलांची अलंघनीय आज्ञा कां येऊन ठेपली असती ? तेव्हां दैवानें आम्हांस आधीं खूप वर चढवून शेवटीं तोंडघशीं पाडलें. तथापि देवीचा सत्कार करण्यांत मजकडून यत्किंचितूहि अनमान होणार नाहीं."

सायंकाळ झाली. कादंबरीच्या वृत्तान्तानें अगोदरच संतप्त झालेल्या चंद्रापीडाला आणखी कशाला ताप द्यावा म्हणूनच कीं काय, कृपाळू सूर्यानें तप्त सुवर्णाप्रमाणें पसरलेले आपले प्रखर किरण आवरून घेतले. तेव्हां, 'जा, तूं आतां विश्रांति घे' असें केयूरकास सांगून चंद्रापीड आपल्याच विचारांत मग्न होऊन राहिला. त्याच्या डोक्यांत विचारांचें काहूर उसळलें.

वडीलमातोश्रींस न कळवितां व त्यांचा आशीर्वाद न घेतां जावें तर मग मनाला समाधान कोठलें ? व मनोरथसिद्धि तरी कोठली ? मातापितरांना संतोष देणें हें माझें जीवितकर्तव्य नाहीं काय ? पूज्य पित्याला मजखेरीज दुसरें कोण आहे ? माझी प्रिय माता कोणाच्या तोंडाकडे पाहील ? बरें त्यांच्या संमतीनें जावें तर निमित्त तरी काय सांगूं ? शोभण्यासारखी सबब तर कांहींच दिसत नाहीं. माझ्यासाठीं कादंबरीला विरहवेदना होत आहेत म्हणून सांगूं ? किंवा तिजवांचून माझे प्राण वांचत नाहींत म्हणून सांगूं ? छे, हें बरोबर नाहीं. या वेळीं माझा मित्र वैशंपायन येथें पाहिजे होता. त्यानें कांहीं तरी युक्ति सुचविली असती.

अशा प्रकारचे विचार चंद्रापीडाच्या मनांत घोळत असतां रात्र तेव्हांच संपली. उजाडतांच दशपुरापर्यंत चंद्रापीडाचें सैन्य येऊन पोंचल्याची वार्ता आली. 'अहाहा, आतां मी धन्य आहें. दैवानें खैर केली. माझा दुसरा प्राणच असा वैशंपायन येत आहे' असे उद्गार चंद्रापीडाच्या मुखावाटे बाहेर पडले. केयूरकास बोलावून आणून तो म्हणाला,

'केयूरका, आतां आपलें काम झालें. वैशंपायन आला.' केयूरकानें म्हटलें, "वाः! फार चांगलें झालें! महाराजांच्या मना-सारखीच गोष्ट झाली. आतां मी पुढें जातों. महाराजांचें मन तर पुढें गेलेंच आहे. आतां माझ्या पाठोपाठ देहानें महाराजांची स्वारी निघेलच." "केयूरका, तूं चांगला विचार काढलास. माझ्या येण्या-विषयीं कादंबरीला संशय राहूं नये म्हणून पत्रलेखेलाहि तूं आपल्या-बरोबर पुढें घेऊन जा. ती देवीला इकडील सर्व हकीकत सांगून धीर देईल. मेघनाद सेनापति तुम्हांस अच्छोदापर्यंत पोंचविण्यास येईल." असें म्हणून चंद्रापीडानें आपलीं कर्णभूषणें काढून तीं केयूरकाच्या कानांत घातलीं; जणूं काय अनेक वर्णांनीं युक्त असा हा निरोपच त्यानें त्याच्या कानांत सांगितला.

## प्रकरण २१ वें

# चंद्रापीड वैशंपायनास सामोरा जातो

केयूरक निघून गेल्यावर, चंद्रापीडाच्या मनांत विचार आला कीं, वैशंपायनास सामोरें जावें. म्हणून वडिलांची आज्ञा मिळविण्याला तो त्यांच्याकडे गेला. तेव्हां त्याला आपल्याजवळ बसवून तारापीड प्रधानाकडे वळून म्हणाला, 'आमच्या चिरंजिवांकडे पाहिलें का ? प्रफुल्लित कमलावरील जशी भ्रमरपंक्ति तशी चंद्रापीडाच्या मुखावरची ही रोमपंक्ति ( मिशी ) आपण अद्याप पाहिली नाहीं का ? हें तारुण्याचें लक्षण असून हा विवाह करण्याला योग्य झाला असें ही मिसुड सुचवीत आहे. याकरितां देवींचा विचार घेऊन एखादी सुंदर व कुलीन राजकन्या पाहून आणावी, आणि आमच्या दृष्टीस सुनमुख पाडून आम्हांला आनंदित करावें.'

शुकनासानें स्मितपूर्वक उत्तर केलें. "महाराजांच्या मनांत फार चांगला विचार आला. युवराजानें पूर्वींच दिग्वधूंचें करग्रहण केलें असून राज्यलक्ष्मीला सुस्थिर केलें आहे. तसेंच समुद्रवलयांकित अखिल भूमीचें यानें पाणिग्रहण केलें आहे; तेव्हां यानें वरायचें असें आतां काय उरलें आहे ?"

अशा प्रकारचीं राजाप्रधानांचीं भाषणें चाललीं असतां, चंद्रापीड लाजून खालीं मान घालून बसला होता. त्याला मनांतून अवर्णनीय आनंद झाला. समुद्रांत पडलेल्याला जशी नांव सांपडावी, अगर निबिड अरण्यांतून जाणाऱ्याला वाटाड्या मिळावा, तशी ही प्रसंगोचितच गोष्ट निघाली आहे असे विचार त्याच्या मनांत चालले होते.

मग वैशंपायनास घेऊन येण्याविषयीं वडिलांची आज्ञा मिळतांच चंद्रापीडानें आपलें प्रयाण सुचविण्याकरितां म्हणून शंख फुंकण्याची आज्ञा केली. शंखनादानें आकाश दुमदुमून गेलें. चंद्रापीडाच्या

हृदयांतील उत्साह दुप्पट वाढला. स्वारीबरोबर निघणारांची एकच धांदल उडून गेली. घोडे कान टवकारून इकडे तिकडे पाहूं लागले. स्वारांनी हातांत भाले धरले. त्यामुळें हें भाल्याचें वनच उभें आहेसें भासलें.

वैशंपायनाला भेटण्याच्या उत्सुकतेनें चंद्रापीड भरधांव घोडा फेकीत चालला. दहाबारा कोस गेल्यावर समुद्रासारखें अफाट पसरलेलें सैन्य त्याच्या दृष्टीस पडलें तेव्हां तो उद्गारला, 'मी आतां अवचित येऊन भेटेन असे वैशंपायनाच्या ध्यानीमनींहि नसेल.'

त्या वेळीं चंद्रापीडाचें सैन्य त्या ठिकाणीं नुकतेंच येऊन उतरलें होतें आणि लोक चिंताक्रांत असून आपापल्या कामांत गुंतले होते. चंद्रापीडानें छत्रचामरादि राजचिन्हें बाजूस ठेवलीं व डोक्याला फक्त शेला गुंडाळून प्रत्येक तंबूजवळ जाऊन 'वैशंपायन कोठें आहे?' असें तो विचारूं लागला. त्याला न ओळखून एका तंबूंतील स्त्रिया म्हणाल्या, 'बाबा, काय पुसत हिंडतोस? इथं कुठला वैशंपायन!' चंद्रापीडानें घाबरून उत्तर केलें, असें काय भलतेंच बोलतां? गाईची चुकामूक झाल्यानें वासरूं जसें घाबरून वर कान करून पळत सुटतें, किंवा कळपांतून चुकलेला हत्तीचा छावा जसा सैरावैरा धांवत सुटतो, तशी चंद्रापीडाच्या मनाची अवस्था झाली. तो नीट पाहीना, नीट बोलेना, नीट ऐकेना; मी कोठें आलों, कशाकरितां आलों, हें त्याला कांहीच सुचेना. शेवटीं आंधळ्यासारखा, मुक्यासारखा किंवा भ्रमिष्टासारखा तो तशाच वेगानें छावणीच्या मध्यभागीं येऊन थडकला.

इंद्रायुध अश्वाला व चंद्रापीडाला ओळखून कांहीं राजेलोक व सैनिक उदास मुद्रेनें त्या ठिकाणीं धावत येऊन युवराजाच्या पायां पडूं लागले. चंद्रापीड धापा टाकीत टाकीत त्यांना विचारूं लागला. तेव्हां "वैशंपायन कोठें आहे तें मला आधीं सांगा पाहूं."

'महाराजांनीं या झाडाखालीं थोडा वेळ विश्रांति घ्यावी म्हणजे सर्व वर्तमान सांगतों' असें त्यांनीं उत्तर दिलें.

हें संदिग्ध भाषण ऐकून चंद्रापीडाच्या मनांत अनेक तर्कवितर्क सुरू झाले. माझें मित्ररत्न कोणीं चोरून नेलें? मी आतां कोणाशीं बोलूं? कोणाला भेटूं? का आत्महत्या करूं? का अरण्यांत निघून जाऊं?

त्यानें विचारलें, 'राजेलोकहो, बोला, वैशंपायनाच्या प्राणावर कांहीं प्रसंग गुदरला आहे, का त्याला एखाद्या असाध्य रोगानें पछाडलें आहे?'

'महाराज जसे दीर्घायुषी आहेत, तसे वैशंपायनहि आहेत.'

'मग तुम्ही त्याला एकट्याला सोडून इकडे कसे आलां?'

'ऐकावें महाराज,' असें म्हणून त्यांपैकीं एक राजा सर्व घडलेली हकीकत सांगूं लागला.

'महाराज, आपण निघून गेल्यावर दुसऱ्याच दिवशीं आम्ही उज्जयिनीला जाण्यास सज्ज झालों. तेव्हां वैशंपायन म्हणाले, "अच्छोद सरोवराचें स्नान करून व महादेवाचें दर्शन घेऊन मग निघण्याचें करूं. पुराणांत वर्णिलेली ही पुण्यभूमि फिरून कशानें आमच्या दृष्टीस पडणार?" असें बोलून ते एकटेच स्नानाला गेले. सरोवराकांठचा अति रमणीय प्रदेश पाहात पाहात ते चालले असतां एक सुंदर हिरवेंगार लतागृह त्यांच्या दृष्टीला पडलें. पापणीला पापणी न लावतां ते चित्रासारखे तिकडेच पाहात राहिले. त्यांच्या डोळ्यावाटे अश्रुधारा वाहूं लागल्या. पुढें अंग सावरेनासें होऊन ते मटकन् खालीं बसले.'

आम्ही तेथें जाऊन त्यांना म्हटलें, "सर्व सैनिक लोक आपली वाट पाहात आहेत." प्रथम त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. आम्हीं फारच आग्रह केल्यावर ते म्हणाले, "हें स्थान सोडून मी कांहीं केल्या येणार नाहीं. तुम्ही आपलें सैन्य घेऊन येथून जा कसे? सांप्रत मी स्वतःच्या अधीन राहिलों नाहीं. कोणाची तरी चुकामूक

झाल्यासारखें माझ्या मनाला वाटत आहे. या स्थळीं माझें शरीर अगदीं जखडून टाकल्यासारखें झालें आहे. तुम्ही मला हट्टानें न्याल तर माझे प्राण राहातील असें मला कांहीं वाटत नाहीं. अभागी मी चंद्रापीडाच्या दर्शनसुखास अंतरलों." असें म्हणून ते जसे कांहीं आपली एखादी हरवलेली वस्तु त्या ठिकाणीं शोधूं लागले.

'आज नाहीं उद्यां ते शुद्धीवर येतील म्हणून आम्हीं त्यांची तीन दिवस वाट पाहिली. शेवटीं निरुपायानें व निराशेनें त्यांचा कांहीं परिवार तेथेंच ठेवून आम्ही इकडे निघून आलों.'

हें ऐकून चंद्रापीडाला सखेदाश्चर्य वाटलें. 'शिव शिव! मित्राची अशी अवस्था कशाने झाली असेल कांहीं उमगत नाहीं! माझ्या हातून कांहीं चूकवीक तर झालेली दिसत नाहीं. त्याचे मन प्रपंचास विटलें म्हणावें, तर संसारसुखाचा त्यानें अद्याप कांहींच आस्वाद घेतलेला नाहीं. हा कांहीं त्याचा वानप्रस्थाश्रमाचा काळ नव्हे.' याप्रमाणें उद्वेगपूर्ण उद्गार काढून त्यानें आपल्या सैनिकांस पुढें कूच करण्यास आज्ञा केली व तो स्वतः पुनः विचारांत निमग्न झाला. 'वडिलांची आज्ञा न घेतां मी या ठिकाणाहून वैशंपायनाकडे गेलों तर मीं वैशंपायनाचेंच अनुकरण केल्यासारखें होईल. म्हणून त्यांची अनुमति घेऊन जावें हेंच उचित. वैशंपायनाच्या शोधाकरितां मी गेलों म्हणजे त्याला बरोबर घेऊन तसाच पुढें कादंबरीकडे जाईन म्हणजे झालें. हें एक निमित्त माझ्या पथ्यावरच पडलें म्हणावयाचें.' असा विचार करून चंद्रापीड रात्र उलटल्यावर उज्जयिनीला निघाला व उजाडण्याच्या सुमारास तेथें जाऊन पोंचला.

## प्रकरण २२ वें

# दोष कोणाचा ?

इकडे वैशंपायनासंबंधींची वार्ता उज्जयिनी नगरांत सर्वतोमुखीं झाली. कोणी शिव शिव! कोणी अरेरे! असे दुःखोद्गार काढीत आहेत असें वेशीजवळच चंद्रापीडास आढळून आलें. पण तो आजूबाजूस न पाहातां अथवा कोणाशीं न बोलतां तडक राजवाड्यापाशीं गेला. तेथें त्याला असें समजून आलें कीं, आपले मातापितर शुकनास व मनोरमा यांचें सांत्वन करण्याकरितां गेले आहेत. म्हणून तोहि तिकडेच गेला. प्रधानाच्या वाड्याजवळ येतांच मनोरमेचा हृदयभेदी टाहो त्याच्या कानीं पडला :

"बाळा, ओसाड अरण्यांत तूं एकटाच कसा रे राहिलास? तेथें हिंस्र श्वापदें असतात. वत्सा, चंद्रापीडावांचून तुला करमत नव्हतें ना? मग आतां त्याला सोडून एकटा कसा राहिलास? बाळा वैशंपायना, तूं दृष्टीस पडला नाहींस तर माझे प्राण कसे बरें राहातील? तुला जिकडे राहावेसें वाटेल तिकडे वडिलांना विचारून मला घेऊन चल."

विलासवतीचाहि कंठ दाटून आला होता व ती मनोरमेचें समाधान करीत होती. चंद्रापीड धैर्य धरून आंत गेला आणि वडील माणसांस तोंड कसें दाखवावें याची लाज वाटून खिन्नतेनें मान खालीं घालून बसला. दुरूनच त्याला पाहून तारापीड क्षुब्ध होऊन ओरडला, 'चंद्रापीडा, वैशंपायनाची अशी वृत्ति होण्याला तुझीच कांहीं तरी चूक झाली असली पाहिजे'........

शुकनास मध्येंच नम्रपणें म्हणाला, "महाराज, सूर्याच्या ठायीं काळोख संभवत असेल, अथवा चंद्राच्या ठायीं उष्णतेचा संभव असेल,

तर मात्र युवराजांच्या ठायीं दोष संभवेल. [1]गुणवानास दोषी ठरविणें यासारखें दुःखकारक असें दुसरें कांहींच नाहीं. माझा पुत्र वैशंपायनच मित्रद्रोही निघाला यांत चंद्रापीडाचा काय दोष? महाराजांनीं व देवी विलासवतींनीं मांडीवर खेळवून ज्याला शिक्षणामृत पाजलें त्यानें तें विसरून कृतघ्न बनावें काय? मातापितरांचा मी एकुलता एक आहें, हें त्या मातृपितृघातक्याच्या ध्यानांत सुद्धां कसें आलें नाहीं? [2]पशुपक्ष्यांच्याहि ठायीं देखील कृतज्ञता दिसून येते, तेवढी देखील त्याच्या ठायीं नसावी का? मला वाटतें असल्या आचरणानें तो चांडाळ पशुपक्ष्यांच्या योनींत जन्माला येईल."

अशा प्रकारें शुकनास संतापून बोलत असतां त्याचे ओंठ थरथर कांपत होते. त्याच्या मुखावाटे प्रत्येक शब्द बाहेर येत होता तो जणूं काय त्याचें अंतःकरण पिळवटून, किंबहुना तें भेदून बाहेर येत होता. हें पाहून तारापीड म्हणाला, 'शुकनास, तुम्हांला बोध करणें म्हणजे जलबिंदूनें समुद्राला भरती आणण्यासारखें आहे. तथापि महापुरानें जसें सरोवराचें पाणी गढूळ होतें तद्वत् विद्वान बहुश्रुत व विचारवंत मानवाचेंहि विशुद्ध मानस दुःखातिशयानें कलुषित होऊन जातें. मग विचार व बुद्धि यांचें तरी काय चालणार? शुकनास, जगांतील व्यवहार तुम्हांला माहीत आहेत. तारुण्य प्राप्त झालें असतां प्रायः सर्वांच्या हातून प्रमाद घडतात. सामान्यतः शैशव नाहींसें झाल्याबरोबर गुरुजनांविषयीं आदर नष्ट होतो. तारुण्यांत छाती रुंदावते व त्याबरोबर तरुणाच्या वासनाहि अमर्याद वाढतात. तारुण्यांत दंड भरदार होतात व त्याबरोबर तरुणाची बुद्धीहि स्थूल होते. म्हणून वडील माणसाचा उपदेश तरुणाच्या कानांत शिरत

---

१ न ह्यतः परमपरं कष्टतमं किंचिदपि, यद्गुणेषु वर्तमानो दोषेषु संभाव्यते।
२ तिर्यञ्चोऽपि कृतं जानन्ति।

नाहीं. शुकनास, तुम्ही रागाच्या भरांत बाळकावर आग पाखडून भलतेंच बोललांत. वडील माणसांचे आशीर्वाद सफल होतात, त्याप्रमाणें शापहि सफल होतात. आतां तरी क्रोध आवरा. मला वैशंपायनाविषयीं काळजी वाटूं लागली आहे. सर्वसंगपरित्याग करून त्यानें अरण्यवास पत्करिला यांत त्यानें एवढें वाईट तें काय केलें ? शिवाय खरें कारण कळण्यापूर्वीं त्याला दोष देणें उचित नव्हे. अगोदर त्याला आणण्याची तजवीज करावी म्हणजे आपोआप सर्व गोष्टी समजून येतील.'

यावर शुकनासानें म्हटलें,'महाराज, वात्सल्यातिशयानेंच आपल्या उदार व क्षमाशील अंतःकरणाला असें वाटतें.'

तारापीड चंद्रापीडावर दोषारोप करीत असतां हृदयावर चाबकाचे तडाखे मारल्यासारखें चंद्रापीडाला होऊन गेलें होतें. क्षणभरानें तो दुःखाश्रु ढाळीत शुकनासाजवळ येऊन म्हणाला, 'आर्या, माझ्या चुकीमुळें वैशंपायन आला नाहीं असें मात्र नाहीं. इकडून तातडीनें निघून येण्याविषयीं पत्र आले म्हणूनच मी पुढें आलों. माझ्या सांगण्याप्रमाणें वैशंपायन दुसऱ्या दिवशीं परत फिरणार होता. तथापि वडिलांनीं जर मला दोष दिला तर इतर लोक मला नांवें ठेवल्यावांचून कसे राहातील ? या दोषाचें परिमार्जन करण्याकरितां वैशंपायनाला जाऊन आणण्याची वडिलांकडून मला अनुज्ञा देववावी.'

युवराजाच्या इच्छेनुरूप शुकनासानें तारापीडास विनंती केल्यावर तो सचिंत मुद्रेनें म्हणाला, ' शुकनास, चंद्राची जशी चंद्रिका तशी चंद्रापीडाला शोभविणारी वधू पाहावी असें माझ्या मनांत होतें; पण दुर्दैवानें हें आकस्मिक संकट मध्येंच उद्भवलें. चंद्रापीडालाच हें निस्तरलें पाहिजे. तो गेल्याखेरीज वैशंपायन येणार नाहीं हेंहि खरेंच, तरी तुम्ही चांगलासा मुहूर्त पाहून त्याची तिकडे रवानगी करावी.'

## प्रकरण २३ वें

# चंद्रापीडाचें प्रस्थान

वडिलांची आज्ञा म्हणजे कादंबरीला वरण्याची माळच होय असें चंद्रापीडाच्या मनाला वाटलें. तथापि त्याचा चेहेरा उतरून गेला होता. आनंदापेक्षां चिंतातुरतेचीच त्यावर विशेष छाया दिसत होती. घाईघाईनें तो आपल्या आईच्या भेटीला गेला. तेथें मनोरमाबाई होती ती म्हणाली, ' बाळा, तो एक गेला. आतां तूंहि जातों म्हणतोस. मग आमचे प्राण कसे राहावे ? चंद्रापीडा, माझें ऐक. तूं जाऊं नकोस. एका पुत्रानेंच आम्ही दोघी पुत्रवती राहूं.' विलासवती म्हणाली, ' प्रियसखि, तूं म्हणतेस तें अगदीं खरें; पण वैशंपायनावांचून याला तरी कसें चैन पडेल ? तूंच सांग. तेव्हां याला आज मोडता घालूं नकोस.'

वडील माणसांची आज्ञा मिळाल्यावर चंद्रापीड फारच उतावीळ झाला. मुहूर्त कळेपर्यंत त्याला दम कोठला ? त्यानें ज्योतिष्यांना एकान्तीं बोलावून सांगितलें कीं, ' मला लवकर निघतां येईल असा मुहूर्त प्रधानास काढून द्या.' ज्योतिषी पत्रिका पाहून म्हणाले, ' आमच्या मतें सांप्रत महाराजांचें गमन प्रशस्त नाहीं. पण निकडीचें काम असेल तर आपल्या इच्छेला येईल तो मुहूर्त ! राजा कालस्य कारणम्. कालाचें माहात्म्य राजा ठेवील तसें राहतें.' यावर चंद्रापीडानें म्हटलें, ' उद्योगी पुरुषांनीं क्षणोक्षणीं कोठवर मुहूर्त पाहावे ? त्यांना किती तरी कामें करावयाचीं असतात. पित्याची आज्ञा म्हणूनच मीं तुम्हांस मुहूर्त काढायला सांगितलें. तरी उद्यांचाच मुहूर्त त्यांना कळवा.'

दुसऱ्या दिवशीं चंद्रापीड जावयास निघाला. मातापितरांना त्यानें वंदन केलें, तेव्हां अश्रूंनीं जणूं त्याला न्हाऊं घालून विलासवती गहिं,

वरून म्हणाली, 'बाळा, आज माझा जीव फार व्याकुळ होऊं लागला आहे. नको जाऊं असेंहि जिभेनें म्हणवत नाहीं व जा असेंहि म्हणवत नाहीं. माझ्या पापिणीच्या काय दृष्टीला पडावयाचें आहे कोण जाणे? माझी अवस्था लक्ष्यांत आणून, पूर्वी जसा फार दिवस तिकडेच राहिलास तसा आतां राहूं नकोस.'

चंद्रापीड म्हणाला, 'आई, त्या वेळीं मी दिग्विजयाला गेलों होतों. आज वैशंपायनाला आणायचें एवढेंच काम. तूं कांहीं काळजी करूं नकोस.'

मग तारापीडानें त्याला आशीर्वाद देऊन म्हटलें,'मी तुला दोष दिला म्हणून मनाला लावून घेऊं नकोस. मी तुला एवढें राज्य दिलें तें केवळ पुत्रस्नेहानें नसून तुझ्या सद्गुणांकडे बघून दिलें. आतां तुला प्रजेचें रंजन करण्याला झटलें पाहिजे. आमचे दिवस गेले. आजवर आम्ही अधिकारमदानें कोणाची अमर्यादा केली नाहीं. आम्ही कीर्तीस जपलों, या नश्वर देहास नाहीं. अपकीर्तीस भ्यालों, मृत्यूस नाहीं. आतां मनीषा इतकीच कीं, तुझें विवाहमंगल करून वानप्रस्थाश्रमाचा आश्रय करावा. यास्तव माझे मनोरथ जागचे जागीं विलीन होणार नाहींत असें कर. सत्वर परत ये; एवढेंच तुला सांगणें आहे.'

शिप्रा नदीच्या तीरावर ज्या ठिकाणाहून युवराजाची स्वारी जावयाची होती, त्या स्थळीं प्रधानानें सर्व लवाजमा तयार ठेवून तें ठिकाण ध्वजापताकांनीं शृंगारलें होतें. पण उजाडण्यापूर्वींच युवराज परभारें दुसऱ्याच रस्त्यानें गेले, असा तेथें एकच गलबला झाला.

चंद्रापीड इंद्रायुधावर आरूढ झाला, तेव्हां इंद्रायुध मागें मागें सरकत रडक्या स्वरानें खिंकाळूं लागला. हें दुश्चिन्ह समजून आपलें कोणी निवारण तर करणार नाहीं ना, असें चंद्रापीडाच्या मनांत आलें म्हणून त्यानें क्षणभरहि न थांबतां थोड्या स्वारांनिशीं तांतडीनें नगराबाहेर पडून अच्छोद सरोवराचा मार्ग धरला.

---

## प्रकरण २४ वें

# वैशंपायनाचा शोध

चंद्रापीड मार्ग क्रमीत असतां मनोराज्यांत मग्न होऊन गेला. मी तेथें गेलों म्हणजे मागून हळूच जाऊन वैशंपायनाला घट्ट धरीन. तो लज्जित होऊन एकीकडे जाऊं लागला तर 'आतां कोठें जातोस?' असें म्हणून मी त्याच्या मनांतलें वेड घालवीन. नंतर महाश्वेतेला भेटेन. ती मला कादंबरीकडे घेऊन जाईल व आमच्या दोघांचा लग्नाचा घाट जमवून आणील.

याप्रमाणें नानाप्रकारचे हजारों कल्पनातरंग चंद्रापीडाच्या हृदय-सागरांत उचंबळत होते. तो तहान विसरला, भूक विसरला.

सुमारें अर्धाअधिक रस्ता चालून गेल्यावर काळ्याकुट्ट मेघांनीं दशदिशा व्यापल्या. मयूर आनंदानें नृत्य करूं लागले. बेडकांच्या 'डरांव डरांव'नें कानठळ्या बसूं लागल्या. मेघांचा गडगडाट व विजांचा चकचकाट सुरू झाला. मुसळधार पाऊस पडूं लागला. चंद्रापीड नखशिखान्त भिजून गेला. पण त्यानें कोणत्याहि विघ्नांना जुमानलें नाहीं. केव्हां एकदां तेथें जाईन हा एकच ध्यास त्याला लागला होता. कसेंबसें एकदांचें त्यानें अच्छोद सरोवर गांठलें.

घोड्यावरून खालीं न उतरतां चंद्रापीड मोठ्या आशेनें वैशंपायनाला इकडे तिकडे धुंडाळूं लागला. कदाचित् आपण आल्याचा सुगावा लागून वैशंपायन ओशाळून दूर कोठें तरी पळून जाईल या भीतीनें त्यानें आपले घोडेस्वार चारी बाजूंला पाळतीवर ठेवले. सर्व रस्ते रोखले, पण काय उपयोग?

'शिव शिव! आतां तर माझे पाय अगदीं मोडल्यासारखे झाले आहेत. मित्रदर्शन नाहीं आणि प्रियादर्शनहि नाहीं.' असे दुःखोद्गार काढीत तो महाश्वेतेच्या आश्रमाकडे वळला. तेथें जाऊन पाहातो

तों महाश्वेता बाहेरच खिन्नपणें बसली होती. चंद्रापीडाला शंका आली कीं, कादंबरीची प्रकृति स्वस्थ नसावी, नाहींतर तिची सखी अशी उद्विग्न होऊन कां बसली असती? म्हणून त्यानें तरलिकेस विचारिलें. ती कांहींएक उत्तर न देतां महाश्वेतेच्या तोंडाकडे पाहात बसली. तेव्हां महाश्वेता डोळ्यांत पाणी आणून सद्गदित कंठानें म्हणाली, महाराज, पूर्वीं मी आपणाला स्वतःची करुण कहाणी निवेदन केली. आज फिरून दुसरें एक अत्यंत शोचनीय वर्तमान सांगण्याचें या चांडाळणीच्या नशिबीं आलें आहे.

आपण उज्जयिनीला गेल्याचें केयूरकाच्या तोंडून ऐकून मला वाटलें कीं, मीं मातापितरांचेहि मनोरथ पूर्ण केले नाहींत आणि कादंबरीसिहि सुखी केलें नाहीं. यामुळें मला अधिकच उद्वेग उत्पन्न झाला व सर्व स्नेहपाश तोडून मी येथें पूर्ववत् तपश्चर्या करण्याला आलें. या सुमारास एके रात्रीं एक तरुण ब्राह्मण हळूहळू पावलें टाकीत इकडे आला. तो रूपानें आपणांसारखाच होता. त्याचें सर्वांग पुलकित झालें होतें. त्याची दृष्टि चंचल असून कांहीं तरी सांडलेली वस्तू तो शोधीत असावा असें दिसलें. मला पाहून तो म्हणाला,

"हे चंद्रानने, तूं आपली सुकुमार काया तपश्चर्येनें उगीच कां सुकवीत आहेस? आपल्या वयाला शोभेल तेंच करावें. हे प्राणसखे, मी तुला शरण आलों आहें."

त्याच्या मनांतील भाव कांहीं निराळाच आहे असें पाहून माझें देहभान नाहींसें झालें. माझा क्रोधाग्नि भडकला आणि मी त्याला निष्ठुरपणें म्हटलें,

" आग लागो तुझ्या तोंडाला! तुझ्या जिभेचे हजारों तुकडे कां झाले नाहींत? ज्या दुष्ट दैवानें तुला शुकाप्रमाणें बोलायला मात्र शिकविलें त्यानें तुला शुकाच्याच योनींत कां जन्माला घातलें नाहीं?

मीच देवाला हात जोडून प्रार्थना करतें कीं, "भुवनभूषणा, रोहिणी-पते, मी जर पतिव्रता असेन, तर मीं म्हटलेल्या जातींत हा मेला जन्माला येवो."

असें मी बोलतें आहे तोंच, मुळें तोडलेल्या झाडाप्रमाणें तो ब्राह्मण धाडकन् धरणीवर पडला आणि गतप्राण झाला. त्याचीं चाकरमाणसें येथें येऊन आक्रोश करूं लागलीं. तेव्हां त्यांच्या बोलण्यावरून मला समजलें कीं, तो आपलाच परम मित्र—

महाश्वेतेच्या तोंडून हे शेवटचे शब्द पुरते बाहेर पडतात न पडतात तोंच चंद्रापीडाचें हृदय विदीर्ण झालें.

"हा मित्रा वैशंपायना! मीच तुझ्याकडे येतों. भगवति महाश्वेते, तुझ्या कृपेनें मला कादंबरीची भेट झाली. पण या जन्मीं विवाहाचा योग आला नाहीं, तो जन्मांतरीं येवो, त्या वेळींहि मला तुझें साहाय्य मिळो." हे शब्द चंद्रापीडानें अत्यंत क्षीण व खोल आवाजांत कसे-बसे उच्चारले व त्याबरोबर त्याचें प्राणोत्क्रमण झालें. डोळ्याच्या बाहुल्या आंत गेल्या. 'हाय! हाय! तरलिके, हें पाहा काय झालें!' असे शोकोद्गार काढून महाश्वेताहि निश्चेष्ट झाली! इंद्रायुध दीन-वाणीनें ओरडूं लागला. तो हिसके देऊन लगाम तोडूं लागला. त्याच्या चर्येवरून असें दिसलें कीं, त्याच्या मनांत अश्वशरीराचा त्याग करावयाचा आहे!

चंद्रापीडाच्या सेवकजनांनीं रडून ओरडून एकच आकांत केला. 'अगे दुष्टे तापसि, सर्वजनांची पीडा हरण करणाऱ्या तारापीडाचा वंश तूं बुडविलास. सर्व प्रजेला अनाथ केलेंस! आम्हीं आतां कोणाची सेवा करावी?' अशा शब्दांनीं ते महाश्वेतेची निर्भर्त्सना करूं लागले.

---

## प्रकरण २५ वें

# सारेंच अद्भुत!

चंद्रापीड अच्छोद सरोवराला येत आहे असें पत्रलेखेच्या तोंडून कादंबरीला समजलें, तेव्हां ती फार अधीर व उतावीळ झाली. तिच्या जिवाची कोण धांदल उडाली! 'मी महाश्वेतेच्या भेटीला जातें' असें आईबापांस निमित्त सांगून ती थाटमाट करून निघाली. पत्रलेखेचा हात धरून चालतां चालतां ती प्रमुदित अंतःकरणानें मदलेखेस म्हणाली,

"मदलेखे, तेथें गेल्यावर जें कांहीं त्याच्याशीं बोलावयाचें तें सगळें तूंच बोल. मी त्याच्याशीं कांहीं एक बोलणार नाहीं; आणि त्यानें कितीहि विनवण्या केल्या तरी मी आपला राग म्हणून सोडणार नाहीं. आणि तूं पण माझी समजूत घालायला येऊं नकोस, समजलीसना?"

चंद्रापीडास केव्हां पाहीन असें कादंबरीला झाल्यामुळें ती मोठ्या घाईनें महाश्वेतेच्या आश्रमाजवळ आली. तेथें पाहाते तों चंद्रविरहित जशी रात्र तशी चंद्रापीडाची गतप्राण काया तिच्या दृष्टीस पडली. 'हें काय हें!' असें म्हणून तिनें हृदयभेदक किंकाळी फोडली व ती क्षणार्धांत मूर्छित होऊन भूमीवर पडली. मदलेखेनें तिला सावरून धरलें. पत्रलेखेचा कादंबरीनें धरलेला हात सुटला आणि तीहि मृतप्राय होऊन पडली! थोड्या वेळानें सावध होऊन कादंबरी वेड्यासारखी चंद्रापीडाच्या मुखाकडे निश्चल दृष्टीनें पाहात बसली. तेव्हां मदलेखा म्हणाली, "प्रियसखि कादंबरि, तुझ्या पायां पडतें. जर तूं रडून रडून हें दुःख बाहेर घालविलें नाहींस तर पाण्यानें तुडुंब भरलेल्या सरोवराप्रमाणें तुझें हें कोमल हृदय कदाचित् फुटून जाईल! त्या बापड्या मदिरादेवी आणि चित्ररथ महा-

राज यांच्याकडे तरी पाहा. तुझ्यावांचून मातृपितृकुळें नष्ट होतील हें लक्षांत आण." कादंबरीनें हंसून उत्तर दिलें, "वेडे, चंद्रापीडाची अशी स्थिति पाहून ज्याचीं हजारों शकलें झालीं नाहींत असें मेलें माझें हृदय वज्रापेक्षांहि कठीण आहे, तें फुटणार गे कुठून? माझ्या हृदयवल्लभाचें शरीर हातीं लागलें आहे. आणखी काय पाहिजे? हा लाभ काय थोडा झाला? स्वर्गाला जाणाऱ्या जीवाला उगीच रडून अपशकुन कशाला करूं? माझ्यासाठीं इतक्या लांब येथें येऊन ज्यांनीं आपले पंचप्राण सोडले, त्यांच्याशीं सहगमन करून मी सर्व दुःखाचा एकदम शेवट करितें. म्हणून ही आनंदाची वेळ आहे, शोकाची नव्हे! मदलेखे, माझ्यावर तुझें खरेंच जर प्रेम असेल तर तूं तें यापुढें माझ्या आईबापांवर ठेव. माझ्याठायीं तूंच त्यांना हो. माझ्या मैत्रिणींना मीं विचारलें आहे म्हणून सांग. माझ्या अंगणांत मीं लाविलेला आंब्याचा रोपा व मालतीलतिका यांचें कौतुकानें तूंच विवाहमंगल कर. शुकसारिकांना पिंजऱ्यांतून सोडून दे. बालहरिणांना तपोवनांत नेऊन पोंचीव. माझीं वस्त्रभूषणें ब्राह्मणांना देऊन टाक. फार काय सांगूं? तुला योग्य वाटेल ते तूं कर."

मग कादंबरीनें मदलेखेला सोडून महाश्वेतेच्या गळ्याला मिठी घातली व ती शांतपणें म्हणाली, 'प्रियसखि, तुला प्रियसमागमाची आशा आहे म्हणून तुला मरणापेक्षांहि अधिक दुःख सहन होतें. पण मला ती आशाच नाहीं. याकरितां दुसऱ्या जन्मींहि प्रियमैत्रिणीचा सहवास घडो असें परमेश्वरापाशीं पदर पसरून मी मागणें मागतें.'

असें बोलून कादंबरीनें चंद्रापीडाचे चरण आपल्या मांडीवर घेऊन त्यावर आपलें मस्तक ठेविलें. त्या वेळीं तिच्या विस्कळित झालेल्या वेणींतून चंद्रापीडाच्या पायांवर पुष्पें गळून पडत होतीं. जणूं काय कादंबरी आपल्या हृदयदेवाची पूजाच करीत होती.

काय आश्चर्य पाहा! कादंबरीच्या हाताचा स्पर्श होतांच चंद्रापी-

डाचें शरीर टवटवीत व तेजस्वी दिसूं लागलें आणि त्यांतून चंद्रासारखी ज्योति बाहेर निघून दशदिशा धवल करीत अंतरिक्षांत निघून गेली! त्याबरोबर आकाशवाणी झाली कीं, "महाश्वेते, फिरून एकवार मी तुला आश्वासन देतों. ऐक. तुझ्या पुंडरीकाचा अविनाशी देह चंद्रलोकीं माझ्या तेजानें सचेतन होत आहे. त्याचा आणि तुझा समागम होईल. तसेंच हें दुसरें चंद्रापीडाचें शरीर माझेंच असून तुम्हांला विश्वास यावा म्हणून तुमच्यापाशींच ठेविलें आहे. शापरूपी राहूनें तें ग्रासून टाकलें आहे. शाप संपेपर्यंत तें तसेंच असूं द्या. त्याला अग्नि देऊं नका, किंवा पाण्यांत टाकूं नका. शापाची बाधा नष्ट झाल्यावर कादंबरीचा व चंद्रापीडाचा समागम होईल."

याच समयीं दुसरा एक चमत्कार झाला. वर जाणाऱ्या तेजाच्या शीतल व आल्हादकारक स्पर्शानें पत्रलेखा सावध झाली. 'महाराज दूर गेले असतां येथें राहाणें तुला योग्य नाहीं.' असें म्हणून तिनें इंद्रायुधाचा लगाम हिसकला आणि त्याच्यासह अच्छोद सरोवरांत उडी घेतली! सरोवरांतून एक तापसकुमार बाहेर आला. आपल्या तोंडावर पसरलेल्या भिजलेल्या जटा हातानें मागें सारीत सारीत तो महाश्वेतेसमीप येऊन म्हणाला, 'महाश्वेते, तूं मला ओळखिलेंस का?' गडबडीनें उठून नमस्कार करीत महाश्वेता म्हणाली, 'भगवन कपिंजले, तुम्हांला का मी ओळखणार नाहीं? बरें मुनिश्रेष्ठा, पुंडरीकावांचून आपण एकटेच कसे आलां? त्यांना ज्यानें उचलून नेलें तो कोण? आपण आजवर कोठें होतां?'

'समग्र वृत्तान्त सांगतों ऐका,' असें म्हणून कपिंजलानें, पुंडरीक व चंद्र यांनीं एकमेकांस कोणत्या निमित्तानें काय शाप दिले, त्यांचा परिणाम काय झाला, ज्यानें पुंडरीकास उचलून वर नेलें तो दुसरा तिसरा कोणी नसून ज्याच्या कुळांत ही महाश्वेता जन्माला

आली तो प्रत्यक्ष चंद्रच होय, इत्यादि चंद्रलोकची प्रत्यक्ष पाहिलेली व ऐकलेली हकीकत सांगितली. तो म्हणाला, चंद्रापीड हा चंद्राचा अवतार होय व ज्याला तूं शाप दिलास तो पुंडरीकाचा अवतार वैशंपायन होय. पूर्वजन्मींच्या प्रेमाचें स्मरण होऊनच तो तुजजवळ आला.

'हा प्रिया पुंडरीका, जन्मांतरीं देखील तुम्हाला माझा विसर पडला नाहीं! मी राक्षसीण तुमच्या घातास कारण झालें. एवढ्याचकरितां का त्या दुष्ट ब्रह्मदेवानें मला दीर्घ आयुष्य दिलें आहे?' याप्रमाणें पश्चात्तापानें महाश्वेता स्वतःचा धिक्कार करून शोक करूं लागली.

कपिंजलाचें हृदय कळवळलें. तो म्हणाला, "महाश्वेते, यांत तुझा काय दोष आहे? हा सर्व शापाचा परिणाम! मित्रकार्य करीत असतां मला सुद्धां एका देवानें शाप दिला आणि मी घोड्याच्या जन्माला येऊन चंद्रापीडाचें वाहन इंद्रायुध झालों. माझा मित्र पुंडरीक शुकनासाच्या पोटीं जन्माला आला. अश्वयोनींतहि माझें पूर्वजन्माचें ज्ञान नष्ट झालें नव्हतें. म्हणून मीं किन्नरयुग्माच्या नादीं लावून चंद्रापीडाला इकडे आणिलें. शापाचा अवधि संपून सुखप्राप्तीची वेळ जवळ जवळ येत चालली आहे. आतां शोक करण्याचें काय प्रयोजन? महाश्वेते, तूं जो पुण्यप्रद मार्ग अनुसरीत आहेस तोच चालू ठेव. तपश्चर्येच्या योगानें काय बरें साध्य होणार नाहीं[1]? पार्वतीनें तपाच्या बळावर अत्यंत दुर्लभ असें भगवान शंकराचें देखील अर्धांग मिळविलें; त्याप्रमाणें तुला देखील माझ्या प्रियमित्राची प्राप्ति होईल."

महाश्वेतेला धीर आला. मग कादंबरीनें प्रश्न केला, 'भगवन्

१ तपसो हि नास्त्यसाध्यं नाम किंचित्

पत्रलेखेबरोबरच आपण पाण्यांत प्रवेश केला. तर तिचें हां पुढें काय झालें ?'

'हे राजपुत्रि, मी पाण्यांत बुडाल्यावर पत्रलेखेचें काय झालें हें मला कांहीं माहीत नाहीं, पण तें कळण्याकरितां आणि तसेंच चंद्रापीड आणि वैशंपायन हे आतां कोठें जन्माला येणार आहेत हेंहि कळून घेण्याकरितां मी भगवान श्वेतकेतूंकडे जातों. कारण ते त्रिकालज्ञ आहेत.' अशा प्रकारचें आश्वासन देऊन कपिंजलानें भुर्दिशीं आकाशांत उड्डाण केलें ! सर्वजण आश्चर्यचकित होऊन वर बघूं लागले !

---

प्रकरण २६ वें

## पुढें काय झालें ?

कपिंजल गेल्यावर कादंबरी महाश्वेतेला म्हणाली, 'महाश्वेते, देवानें तुझ्यासारखेंच मला समदुःखी केल्यानें मी आज तुझी खरीखुरी प्रिय-सखी झालें आहें. आतां मी काय करावें हें माझें मला समजत नाहीं. तूंच काय तें सांग.' महाश्वेतेनें उत्तर दिलें, 'यांत विचारायचें आहे काय, अन् सांगायचें आहे काय ? चंद्रापीडाचें शरीर तुझ्या मांडी-वर आहेच, त्याच्या सेवेशिवाय दुसरें काय करायचें ? पाषाणमृत्ति-केच्या मूर्ति पूजिल्या असतां जर ऐहिक व पारमार्थिक कल्याण होतें, तर प्रत्यक्ष चंद्रदेवाचें आराधन केल्यानें तो प्रसन्न झाल्याखेरीज कसा राहील ?'

कादंबरी मुकाट्यानें तेथून उठली आणि निवाऱ्याच्या ठिकाणीं चंद्रापीडाचें शरीर घेऊन गेली. तिनें आपला साज उतरून ठेवला;

स्नान करून धूत वस्त्रें धारण केलीं; आणि ती चंद्रापीडाचे चरण आपल्या मांडीवर घेऊन बसली. 'योजलें होतें काय, आणि झालें काय! जीं सुगंधि पुष्पें व सुगंधि द्रव्यें प्राणेश्वराच्या उपभोगार्थ आणिलीं होतीं तीं त्यांच्या मृत देहावर वाहाण्याचा अघटित प्रसंग दुर्दैवानें घडवून आणिला!' हा विचार मनांत येऊन तिच्या नेत्रांवाटे घळघळां अश्रुधारा वाहूं लागल्या. पण क्षणभरानें शोक आवरून तिनें कांहीं न खातां पितां तो दिवस तसाच घालविला. शिणलेभागलेले सैनिक लोकहि उपाशीच राहिले.

दुसऱ्या दिवशीं चंद्रापीडाच्या तोंडावरील तजेला, पोंवळ्यासारखे तांबुस हातपाय व एकंदर देहाची कांति तशीच कायम राहिलेली पाहून कादंबरीची पक्की खातरी झाली कीं, आकाशवाणी ही खरीच होय! मग मदलेखेला हाक मारून ती म्हणाली, 'मदलेखे, मला महाराजांची चरणसेवा करीत येथेंच बसलें पाहिजे. तेव्हां तूं माझ्या मातापितरांना हा अद्भुत वृत्तान्त जाऊन सांग.'

तिच्या आज्ञेप्रमाणें मदलेखा हेमकूटाला गेली आणि परत येऊन म्हणाली, 'प्रियसखि, तुझ्या मनाप्रमाणें सर्व कांहीं झालें. तुला त्यांनीं आशीर्वादपूर्वक सांगितलें आहे कीं, लोकपाल चंद्राचा अवतार चंद्रापीड याला प्रिय कन्येनें वरलेलें पाहून आम्हांला परम संतोष वाटतो. शाप संपल्यावर आम्ही तुझा मुखचंद्र पाहायला येऊं.' हें ऐकून कादंबरीला अंमळ बरें वाटलें.

वर्षाकाळ संपला तरी युवराज परत येईनात. तेव्हां वैशंपायनासारखीच त्यांची स्थिति झाली नसेल ना, अशी भीतियुक्त शंका येऊन तारापीडानें अच्छोदसरोवराकडे दूत पिटाळले. ते त्या ठिकाणी जवळ जाऊन पोहोंचतांच युवराजांसंबंधाची दुःखकारक वार्ता त्यांच्या कानावर येऊन आदळली; परंतु चंद्रापीडाचें डोळे भरून दर्शन घेतल्यावांचून ते परत जाईनात. म्हणून त्याचें शव ज्या स्थळीं होतें

रया स्थळीं मेघनाद त्यांना घेऊन गेला. सर्वांनीं आपल्या महाराजांच्या देहाला साश्रुपात साष्टांग प्रणिपात केला. तेव्हां त्यांचा अलौकिक भक्तिभाव पाहून कादंबरी त्यांना म्हणाली,

" दूत हो, या अद्भुत प्रकाराचा शेवट गोड होणार असल्यामुळें तुम्ही अगदीं वाईट वाटूं देऊं नका. हें पाहा, तुमच्या युवराजांचें मुख तेजःपुंज दिसत आहे. मनुष्यांमध्यें अशी गोष्ट घडलेली तुम्हीं पूर्वीं कधीं पाहिली आहे का? आतां तुम्ही तारापीडमहाराजांना एवढेंच जाऊन सांगा कीं, ' युवराज अच्छोद सरोवराजवळ आहेत; आमची त्यांची भेट झाली. ' मृत झालेला प्राणी जिवंत होणार आहे ही गोष्ट त्यांनाच काय किंबहुना कोणालाहि खरी वाटणार नाहीं. याकरितां दूर असलेल्या वडील माणसांना या वार्तेनें दुःख देण्याचें कारण नाहीं. त्यांची खात्री पटविण्यासाठीं तुमच्या महाराजांचा विश्वासू सेवक त्वरितक याला बरोबर घेऊन जा. त्यानें अथपासून इतिपर्यंत सकल वृत्तान्त प्रत्यक्ष अवलोकन केला आहे. "

परंतु ते दूत युवराजांना सोडून तेथून पाऊलभरहि हालेनात. कंदमुळें खाऊन महाराजांसन्निध राहावयाचें असा त्यांनीं निर्धार केला. शाबास ! यांनाच म्हणावें सेवक ! संपत्काल किंवा विपत्काल यांपैकीं कोणतीहि स्थिति प्राप्त झाली असतां, इतकेंच काय पण दुःखाचे डोंगरच्या डोंगर कोसळले तरी जे आपल्या स्वामीला सोडून कदापि दूर जात नाहींत तेच खरे सेवक ! वैभवास चढविलें असतां जे नम्र होतात, स्तुति केली असतां जे चढून जात नाहींत, पण उलट लाजल्यासारखे होतात, सांगण्यापूर्वींच धोरण ओळखून जे कार्यतत्पर होतात, पराक्रम केला असतां जे आत्मप्रशंसा करीत नाहींत, समरांगणांत जे ध्वजस्तंभासारखे पुढें होतात व पारितोषिक देण्याच्या वेळीं मागें सरतात.

किंबहुना स्वामिकार्यासाठीं जे स्वार्थावर व प्रसंगीं प्राणावरहि पाणी सोडतात त्यांनाच सेवक म्हणावें.

दूत लोकांचा अशा प्रकारचा कृतसंकल्प पाहून युवराजाप्रमाणेंच देवीची आज्ञा मानणें आपणांला उचित होय, अशी मेघनादानें त्यांची समजावणी करून त्यांना त्वरितकासह उज्जयिनीला धाडून दिलें.

---

## प्रकरण २७ वें

# पुत्रशोक

इकडे विलासवतीची काय अवस्था झाली? ती नगराबाहेरील ग्रामदेवतांच्या देवळांत जाऊन त्यांचा धावा करूं लागली. तिचे चिंतातुर डोळे एकसारखे मुलाच्या वाटेकडे लागले. समोरून कोणी सेवक येत आहेत असें तिला दिसलें मात्र, तों त्यांना मंदिराच्या आवारांतच बोलावून आणून तिनें केविलवाण्या मुद्रेनें विचारलें, 'माझ्या बाळाला तुम्हीं पाहिलें का? तो खुशाल आहे ना?'

दुःखित विलासवतीला पाहून दूतांचें दुःख दुणावलें. ते तोंड खालीं घालून म्हणाले, 'अच्छोद सरोवराच्या तीरीं आम्हीं युवराजांना पाहिलें. बाकीचें वर्तमान त्वरितक सांगेल.' विलासवतीच्या पोटांत चर्र झालें! 'पुढें हा काय सांगणार आहे तें दिसतेंच आहे; जें ऐकवणार नाहीं तें न ऐकलेलेंच बरें. बाळा, तूं कोठें रे गेलास? तूं जाऊं लागलास तेव्हांच माझें मन भलभलतें चिंतूं लागलें होतें. चंद्रापीडा, तुझ्याकडे तरी काय दोष आहे? माझ्या पापाचे हे सगळे खेळ आहेत. माझ्या अदृष्टांत होतें तें चुकावें कसें? बाळा, मी

तुझ्या पायां पडतें; एकवेळ माघारी ये. 'आई ग' म्हणून मला हांक मारीत असतांना तुझ्या मुखाकडे पाहाण्याची मला मोठी हौस वाटते तेवढी पुरी कर. वत्सा, अजून देखील तुझें कांहीं बरें वाईट झालें असेल असें माझ्या मनाला वाटत नाहीं. नाहींतर, केव्हांच त्या मनाचीं शकलें शकलें उडालीं असतीं ! त्वरितका, काय म्हणतोस ? "शोक करूं नका म्हणून ?" बरें तर मी रडत नाहीं, पण मग सांग बरें काय काय झालें तें ?" याप्रमाणें अत्यंत निष्ठुर हृदयाचें देखील पाणी पाणी व्हावें अशा दीनवाण्या स्वरानें ती शोकोद्गार काढीत असतां तिला मूर्च्छेनें घेरलें.

विलासवतीच्या कोणी दासी तिला केळीच्या पानानें वारा घालूं लागल्या तर कोणी चंदनाचा रस तिच्या मस्तकावर शिंपडूं लागल्या. अशा उपचारानें तिनें किंचित् डोळे उघडले.

या अवकाशांत दूत परत आल्याची वार्ता तारापीडाच्या कानीं जाऊन तोहि प्रधानासह तेथें आला व सद्गदित होऊन म्हणाला, 'देवि, उगीच कां जिवाला कष्टवितेस ? आपल्या प्राक्तनांत जितकें सुख मिळायचें होतें तितकें मिळालें. आपण वत्साच्या बाललीला पाहिल्या; बाळाचें अंग धुळीनें भरलें असतां त्याला कटिखांद्यावर घेऊन आपण त्याचे मनसोक्त मुके घेतले. त्याच्या बोबड्या बोलाचें कौतुक केलें. तो विद्या संपादन करून आल्यावर आपणांला कृतार्थता वाटली. त्यानें दिग्विजय केल्यावर आपल्या आनंदाला सीमा उरली नाहीं. आतां एकच इच्छा राहिली होती. पण....सर्वच गोष्टी मनाप्रमाणें होण्यास तितकी पुण्याई लागते ना !

मग तारापीड त्वरितकाकडे वळून म्हणाला, "आम्हांला बाळाचें वर्तमान पुरतें कोठें समजलें आहे ? त्वरितका, सांग बरें."

---

१ सर्वाभिवाञ्छितप्राप्तिस्तु महतः पुण्यराशेः फलम् ।

त्वरितकानें प्रारंभापासून सर्व इत्थंभूत वृत्त सांगण्याला प्रारंभ केला. सांगतां सांगतां, 'युवराजाचें हृदय विदीर्ण........' हें वाक्य त्यानें अर्धेमुर्धें उच्चारलें नाहीं तोंच हातानें खूण करून तारापीड आर्तस्वरानें म्हणाला, "बस्स, पुरें झालें. जें ऐकायचें तें ऐकलें. तुला विचारण्याची माझी हौस पुरली. आमच्या कर्णांची सार्थकता झाली. चंद्रापीडा, तूं आपलें मित्रप्रेम खरें केलेंस. तुझी वैशंपायनावर तशीच प्रीति होती! देवि, ऊठ लौकर. बाळ अजून दूर गेला नसेल तोंच आपण त्याच्या मागोमाग जाऊन त्याला गांठूं. अहो शुकनास, तुम्ही बसलां काय? चिता रचण्याला सेवकांना आज्ञा द्या. सर्व संपत्तीचें ब्राह्मणांना दान करण्याला उपाध्यायांना सांगा. मला आतां कोण उरलें आहे?"

त्वरितक मध्येंच म्हणाला, 'महाराज, हृदय फुटलें तरी युवराज शरीरानें होते तसेच आहेत. शापाच्या प्रभावानें हें सर्व घडून आलें,' असें सांगून तो चंद्रापीड व वैशंपायन या दोघांची साग्र हकीगत कथन करूं लागला. सर्वांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं. 'आ' करून प्रत्येकजण तन्मय होऊन त्वरितकाच्या तोंडचा शब्दन् शब्द ऐकूं लागला. तारापीडाला अनेक खुणा पटल्यावरून एकदां तें वृत्त खरें वाटे, तर एकदां तें असंभवनीय वाटे !

## प्रकरण २८ वें

# सर्वजण निघाले

खरे मित्र असतात ते स्वतः दुःखीकष्टी असले तरी आपलें दुःख विसरून मित्राचें दुःख दूर करण्याविषयीं झटूं लागतात. शुकनासाची तारापीडासारखीच अगतिक स्थिति झाली होती, तरी तो शांतपणें राजाला म्हणाला—

"महाराज, शापामुळें घडलेल्या अनेकविध गोष्टी आपण रामायणमहाभारतांत वाचलेल्या आहेत. अगस्ती ऋषीच्या शापानें नहुष राजा इंद्रपदावरून भ्रष्ट होऊन अजगर झाला. वडिलांच्या शापामुळें त्रिशंकु चांडालयोनींत जन्माला आला. दुसरें असें कीं, चंद्र आपल्या उदरीं जन्माला आला यांत असंभाव्य असें काय आहे? भगवान विष्णु रामरूपानें दशरथाच्या पोटीं अवतरले. दशरथापेक्षां महाराज गुणांनीं कमी आहेत असेंहि नाहीं. शिवाय महाराजांना व मला तसे दृष्टान्त झाले होते. युवराजाचें शरीर जिवंत राहिलें आहे याचें कारण चंद्र हा अमृतमय होय; यास्तव या सर्व गोष्टी खऱ्या आहेत असें महाराजांनीं निःशंकपणें समजावें. शापाचें ग्रहण सुटून आपणांस लवकरच चंद्रापीडमहाराजांचें दर्शन होईल. त्यांचा शाप हा आपणांस वरच आहे असें मी समजतों. त्यामुळें आपणांला पुत्रांचें दैवी स्वरूप कळून आलें. महाराजांनीं आतां दानधर्म करण्यांत कालक्षेप करावा."

तारापीडानें म्हटलें, 'शुकनास, तुम्ही सांगतां तें सर्व खरें आहे; तथापि पुत्राचें मुख केव्हां दृष्टीस पडेल असें आम्हां उभयतांस झालें आहे. त्याच्या दर्शनानेंच आमचें दुःख हलकें होईल.'

थोडासा परिवार घेऊन तारापीड, विलासवती, शुकनास व

---

१ सुहृदस्तु स्वयं दुःखिता अपि विस्मृत्यात्मदुःखं सुहृद्दुःखापनोदायैव यतन्ते ।

मनोरमा हीं सर्वजण अच्छोदसरोवराकडे जावयास निघालीं. उज्ज-यिनीहून उडूनच जावें कीं काय असें त्यांना झालें. ‘आपण तेथें केव्हां पोंचूं ? अजून किती दूर आहे ?’ अशा प्रकारें त्वरितकास वारंवार विचारीत विचारीत ती मंडळी उद्दिष्ट स्थळीं आली. चंद्रापीड झोपीं गेल्यासारखाच दिसत आहे अशी सर्वांना खात्री पटली. तथापि विलासवतीला भडभडून आलें. मुलाला कवटाळण्याकरितां दोन्ही हात पुढें करून ती धाय धाय रडत म्हणाली, ‘बाळा, तुला कशाचा बरें राग आला आहे ? माझ्याशीं एक शब्द तरी बोल. ऊठ आपल्या वडिलांना वंदन कर.’

विलासवतीला दोन्ही हातांनीं सावरून धरून तारापीड म्हणाला, ‘देवि, आमच्या पूर्वपुण्याईनें चंद्रापीड आमच्या पोटीं आला असला तरी तो देव आहे. तो लवकरच जागा होईल. त्याला माणसाप्रमाणें समजूं नकोस. शोक करून काय लाभ आहे ? रडून रडून घसा बसेल, पण हृदय फुटणार नाहीं ! नयनांतून अश्रुपात होईल, पण देहपात होणार नाहीं ! आपण शोक आवरून शुकनास व मनोरमा यांचें समाधान केलें पाहिजे. आपणाला चंद्रापीडाचें दर्शन तरी झालें, परंतु यांचा पुत्र इहलोक सोडून परलोकास गेला आहे. आपण आल्यानें अधिक विव्हल होऊन ही तुझी सून गंधर्व-राजकन्या मूर्च्छित पडली आहे; तिला आधीं सावध कर.’ ‘कुठें आहे माझी सूनबाई ? मुली, सावध हो. तूं अमृतसंजीवनी आहेस. तुझ्या-मुळेंच बाळाचें मुख आमच्या दृष्टीला पडलें. चंद्रापीडाचें शरीर तुज-वांचून कोण रक्षण करण्याला समर्थ आहे ?’ असें म्हणून विलास-वतीनें तिच्या अंगावरून हात फिरविला. विलासवतीच्या प्रेमळ स्पर्शानें व चंद्रापीडाचें नांव ऐकल्यानें कादंबरी शुद्धीवर आली. पण लगेच तिनें लज्जेनें तोंड खालीं घातलें; सासूसासऱ्यांस नमस्कार केला. ‘चिरकाल सौभाग्यवती हो’ असा उभयतांनीं तिला आशी-

र्वाद दिला व म्हटलें, ' मुली, इतके दिवस तूं चंद्रापीडाचे उपचार करीत आहेस तसेच पुढें चालू ठेव. आम्ही दर्शनसुख घ्यावयाचें तें घेतलें.'

त्यानंतर तारापीडानें सर्व राजे लोकांना बहुमानपुरःसर बोलावून आणून म्हटलें, " पुत्रानें स्वतः राज्यकारभार करावा आणि मीं तो पाहावा असें माझ्या दैवांत नाहीं. असो. आतां राहिलेलें आयुष्य येथेंच राहून तपश्चर्येंत घालवावें असें मला वाटतें. मी शोकावेगानें वनवास अंगिकारीत आहें असें नसून हा माझा फार दिवसांचा मनोरथ आहे हें आपणांस विदित आहेच. उतार वयांत जे लोक पारलौकिक कल्याणाचा मार्ग चोखाळीत नाहींत त्यांना गळ्यावर पाय ठेवून खेंचून नेण्यास काळ मागेंपुढें पाहात नाहीं. "

असें बोलून तारापीडानें त्यांना राज्यशकट हाकण्यासाठीं उज्जयिनीस पाठवून दिलें आणि स्वतः तो तपस्व्यास योग्य अशा जागेंत जाऊन राहिला. त्या ठिकाणीं तो लौकिक धनाचा संचय करण्याऐवजीं तपोधनाचा संचय करूं लागला. त्याची राजवाड्यावरची प्रीति पर्णकुटीवर बसली; स्त्रियांवरचें प्रेम लतांवर जडलें; वस्त्रालंकारांची आवड वल्कलानें घेतली; पक्वान्नांची रुचि कंदमुळांत उत्पन्न झाली; इष्टमित्रांचा स्नेह हरिणांच्या ठिकाणीं दिसूं लागला; विनोदी भाषणास लालचावलेले कान धर्मकथांचें यथेच्छ पान करूं लागले; आणि शस्त्र धारण करणारे हात रुद्राक्षमालेवर संतुष्ट झाले.

याप्रमाणें सर्व सुखोपभोगांचा परित्याग करून तारापीडानें परम वैराग्य धारण केलें आणि विलासवती, शुकनास, मनोरमा इत्यादि परिवारासह सकाळसंध्याकाळ चंद्रापीडाचें दर्शन घेत तो त्याच ठिकाणीं आनंदानें कालक्रमणा करूं लागला.

# भाग तिसरा

## प्रकरण २९ वें

## पोपट

विंध्यपर्वत हा आर्यावर्ताच्या मध्यभागीं पूर्वसमुद्रापासून पश्चिम-समुद्रापर्यंत पसरलेला असल्यामुळें तो भरतभूमीचा जणूं कमरपट्टाच शोभतो. याच्या दक्षिणेस दंडकारण्य आहे. तें केवळ धर्माचें निवास-स्थान होय. दाशरथि राम पित्याच्या आज्ञेवरून राज्यत्याग करून लक्ष्मण व सीता यांसह दंडकारण्यांतच राहात होता. सूर्याची वाट अडविणाऱ्या विंध्याद्रीला ज्यांनीं वाकावयास लाविलें ते अगस्त्य ऋषि येथेंच वास्तव्य करीत असत. त्यांच्या आश्रमालगत पंपा नामक एक रमणीय व अगाध सरोवर होतें. अगस्त्य ऋषींनीं समुद्र पिऊन टाक-ल्यामुळें वरुणानें प्रक्षुब्ध होऊन हा दुसरा समुद्रच त्यांच्या आश्र-मासमीप निर्माण केला कीं काय असें या सरोवराकडे पाहून प्रेक्ष-कांना वाटे. पंपा सरोवराच्या पश्चिमेला एक जुनाट व प्रचंड शाल्म-ली वृक्ष होता. तो अरण्यांतील सर्व वनस्पतींचा नायक असून विंध्या-चलाचा चिरसुहृद् झाला होता. आपल्या लांब लांब पसरलेल्या शाखा-बाहूंनीं तो जणुं दिशांची लांबी मोजीत आहे असें वाटे, आणि त्याच्या अंगावरील वेली ह्या म्हातारपणच्या शिराच आहेत कीं काय असा भास होई. त्याला पानें फारच परिमित होतीं; परंतु त्याच्या-वर हजारों पोपट येऊन बसत असल्यामुळें तो हिरव्यागार पल्लवांनीं भरलेला आहे अशी भ्रांति उत्पन्न होई.

या सावरीच्या झाडावर एका घरव्यांत एक पोपटाचें जोडपें राहात असे. त्यास बहुत दिवसांनीं एक पिलूं झालें; पण मादी प्रसववेद-

नेनें तत्काळ मरण पावली. नर म्हातारा झाला असल्यामुळें त्याला फारसें उडतां येत नसे. यास्तव दुसऱ्या पक्ष्यांच्या घरट्यांतून खालीं पडलेले धान्याचे कण व फळांचे तुकडे आणून तो आपल्या पिलाला खाऊं घाली आणि त्यांतून जें उरे तेवढ्यांतच तो आपली गुजराण करी.

एकदां पहाटेच्या सुमारास त्या प्रदेशांत मोठा गलबला ऐकूं येऊन सर्व रान दणाणून गेलें. त्या ठिकाणचे यच्चयावत् प्राणी जीव घेऊन धावत पळत सुटले. ह्या वृक्षावरील सर्व राघू भक्ष्य मिळवि-ण्यास पूर्वींच उडून गेले होते. मात्र तो वृद्ध राघू, त्याचें पिलूं आणि इतर पक्ष्यांचीं पिलें एवढींच काय तीं आपापल्या घरट्यांत भयभीत होऊन लपून बसलीं.

कर्मधर्मसंयोग असा कीं, मृगया करण्याकरितां आलेले भिल्ल लोक पशुपक्ष्यांचा संहार केल्यावर विसावा घेण्याकरितां याच वृक्षा-खालीं येऊन बसले. त्यांचा तरुण नायक इतका बळकट व कळ-कट होता कीं, जणूं काय हा लोखंडाचा पुतळाच घडविलेला आहे असें वाटे. त्याचे अनुयायी जे इतर भिल्ल होते त्यांपैकीं कोणाच्या हातांत सिंहाचीं कातडीं, कोणाच्या हातांत हत्तीचे दांत, तर कोणाच्या पिशवींत मोरांचीं पिसें अशा नानाविध वस्तू होत्या.

भिल्लांचे सदोदित बरोबर असणारे मित्र कोण तर शिकारी कुत्रे; त्यांचें ज्ञान कोणतें तर पशुपक्ष्यांच्या जाति ओळखणें; त्यांचा धर्म कोणता तर देवतांना नरमांस अर्पण करणें; त्यांचें भक्ष्य कोणतें तर मांस; पेय कोणतें तर मद्य; आणि धनुष्यबाण हेंच त्यांचें धन होतें.

श्रमपरिहार झाल्यावर ही भिल्लांची टोळी आल्या वाटेनें निघून गेली; तथापि त्यांच्यापैकीं एक जरठ भिल्ल मागें राहिला. त्या दिवशीं मांस खावयाला मिळालें नसल्यामुळें त्याची क्षुधा शान्त झाली

नव्हती. एखादा पक्षी मिळेल तर पाहावा या उद्देशानें त्यानें त्या वृक्षाच्या शाखांकडे न्याहाळून पाहिलें. आपल्या तीक्ष्ण व करड्या नजरेनें तो जणूं पक्षिशावकांचीं आयुष्यें ग्रासून टाकूं लागला. निर्दय माणसास दुष्कर असें काय आहे ?[१] त्यानें झरझर झाडावर चढून घरट्यांतील जीं जीं पिलें त्याच्या हाताला आलीं त्यांच्या त्यांच्या माना मुरगळून त्यांस खालीं भिरकावून दिलें. होतां होतां त्या म्हाताऱ्या पोपटावर गदा आली. बिचारा आपल्या पिलाला पंखा-खालीं झांकून घट्ट धरून बसला होता. झालें ! त्या भिल्लरूपी दुष्ट काळानें आपला कृष्णसर्पासारखा काळा हात घरट्यांत खुपसला. गरीब बापड्या पक्ष्यानें ची ची करून चोचीनें त्याच्या बोटावर तीव्र प्रहार केले; तरी पण त्या अधमानें पक्ष्याच्या नरडीस नख लावून तें दाबलें आणि दिलें खालीं फेंकून ! भिल्लच तो, त्याला दयामाया कोठली ?

पण सुदैवानें त्याच्या पिल्लाच्या आयुष्याची दोरी बळकट असल्यानें तें पानांच्या ढिगावर पडलें आणि म्हणूनच निभावलें. त्याचा शत्रू झाडावरून खालीं उतरून मृतपक्षी गोळा करून जाण्यापूर्वींच तें पिलूं सरपटत सरपटत पानांच्या आड जाऊन दडून बसलें. त्याच्या पंखांचा रंग पाल्यासारखाच हिरवा असल्यामुळें तें दैववशात् काळाच्या दाढेंतून निसटलें खरें, पण बऱ्याच उंचीवरून पडल्यानें त्याचें अंग ठणकूं लागलें. एखादी गवताची काडी जरी हलली तरी तो यमदूत फिरून आला कीं काय, असा त्याला भास होई. तहानेनें त्याचा घसा कोरडा पडला म्हणून तें खरडत खरडत सरोवराकडे चाललें. पदोपदीं नाकातोंडांत माती शिरून त्याचा जीव घाबरा होऊं लागला; म्हणून तें वाटेंतच पडून राहिलें. तेव्हां त्याच्या मनांत आलें कीं,

---

१ किमिव हि दुष्करमकरुणानाम् ।

[1]कितीहि कष्ट पडले तरी प्राण्याची जीविताशा सुटत नाहीं असें म्हणतात तें अक्षरशः खरें आहे. [2]या जगांत प्राण्यांना प्राणापेक्षां प्यार असें कांहींच नाहीं. ज्यानें माझें मातेप्रमाणें रक्षण केलें तो माझा पिता परलोकीं गेला तरी मी आपला स्वतःच्या जिवाचें रक्षण करीतच आहें. धिक्कार असो मला ! फुकट माझा जन्म ! काय माझा जगून उपयोग ?

---

## प्रकरण ३० वें

# जाबालि महर्षींचा आश्रम

याच वनांत जाबालि नांवाचे महातपस्वी राहात असत. त्यांचा पुत्र हारीत इतर समवयस्क ऋषिकुमारांसह याच मार्गानें स्नानास चालला होता. त्याच्या उजव्या हातांत पळसाचा दंड असून डाव्या हातांत स्फटिकाचा कमंडलु होता. अंगावर कृष्णाजिन शोभत होतें.

[3]साधूंचीं मनें प्रायः स्वभावतःच दयार्द्र असतात. [4]अनाथांचें पालन करणें हा त्यांचा धर्म. वाटेवर पडलेल्या त्या पिलाची मृतप्राय अवस्था पाहून हारीत आपल्या सवंगड्यांना म्हणाला, 'अरे हें राघूचें पिलूं झाडावरून पडलेलें दिसतें; किंवा कदाचित् ससाण्या-च्याहि तोंडांतून पडलेलें असेल. याला अद्यापि पंख फुटलेले दिसत

---

१ अतिकष्टासु दशास्वपि जीवितनिरपेक्षा न भवन्ति खलु जगति प्राणिनां वृत्तयः।

२ नास्ति जीवितादन्यदभिमततरमिह जगति जन्तूनाम्।

३ प्रायेण अतिकरुणार्द्राणि खलु भवन्ति सतां चेतांसि।।

४ अनाथपरिपालनं हि सतां धर्मः।

नाहींत. याच्यांत थोडीशी धुगधुगी आहे तोंवर पाण्याजवळ तरी याला आपण घेऊन जाऊं या.' असें कळवळयानें बोलून हारीतानें त्या पिलाला पंपा सरोवरासंनिध नेवविलें आणि स्वतः त्याच्या चोंचींत पाण्याचे चारपांच थेंब सोडले, तेव्हां कोठें तें सावध झालें. मग यथाविधि स्नान, प्राणायाम व अर्घ्यप्रदान केल्यावर हारीत ऋषि हातांत पिलाला घेऊन तपोवनाला परत यावयास निघाला.

जाबालींचा आश्रम तपोवनाच्या मध्यभागीं असून तेथें एकसारखा वेदघोष चाललेला असे. तो अक्षय्य कानीं पडत राहिल्यानें शुकसारिका देखील त्याचें अनुकरण करून वेदपठण करीत असत. जन्माचें हाडवैर विसरून हरिणबालकें निर्भयपणें सिंहिणींचें स्तनपान करीत. त्या ठिकाणीं होमधूमांतच काय ती मलिनता होती; इतर कोणाच्याहि आचरणांत नव्हती! वृक्षावरील फुलें अहर्निश गळून पडत असल्यामुळें ते वृक्ष मुनिजनांचें पूजनच करीत आहेत असें वाटे. ऋषिवर्यांना स्वर्गांत नेणारे जणू जिनेच कीं काय, असे होमहवनाच्या धुराचे लोटच्यालोट आकाशापर्यंत जाऊन भिडत असत! एतावता त्या स्थळीं मूर्तिमंत पावित्र्य, माधुर्य व निर्भयता नांदत होतीं.

हारीत हा आश्रमांत आला त्या वेळीं जाबालि अशोक वृक्षाच्या छायेंत बसलेले होते. ते हिमालयासारखे स्थिर, सागरासारखे गंभीर, चंद्रासारखे शांत, सूर्यासारखे तेजस्वी व गगनासारखे निर्मळ दिसत होते. अशोक वृक्षाखालींच एका बाजूला हारीतानें पिलाला आणून ठेवून त्यास खाऊं घातलें. त्याबरोबर 'हा शुकबालक कोठून रे आणलास?' असें कांहीं तापसांनीं व तापसकुमारांनीं त्याच्याभोंवतीं जमून त्याला विचारलें. घडलेली सर्व हकीकत निवेदन करून, 'याला आकाशांत उडण्याची ताकद येईपर्यंत येथेंच झाडाच्या ढोलींत ठेवून देऊं' असें हारीत त्यांना सांगत आहे तोंच जाबालि



महर्षि जाबालि ऋषिगणास शुकाची कथा सागत आहेत.... (प्र० ३० ) पृ. ८१

ऋषि कौतुकानें व प्रेमानें त्या पिलाकडे पाहूं लागले. भूत, भविष्य व वर्तमान यांचें त्यांस ज्ञान होतें. यामुळें खूण पटल्यासारखी मुद्रा करून व त्याच्याकडे अंगुलिनिर्देश करून ते म्हणाले, 'हा पोपट आपल्या दुर्वृत्ताचें फळ भोगीत आहे. [1]कारणाशिवाय कार्य होत नाहीं.' इतर ऋषिमंडळी चकित झाली. त्यांचे नेत्र विस्मयानें प्रफुल्ल झाले आणि उत्सुकतेनें त्यांनीं विचारलें—

"भगवन्, या शुकानें पूर्वजन्मीं असें कोणतें दुष्कृत्य केलें होतें? हा कोण होता? पक्षियोनींत हा कसा जन्माला आला? याचें नांव काय? इत्यादि जाणण्याची आम्हांला अत्युत्कट इच्छा आहे. तरी आमची जिज्ञासा कृपा करून तृप्त करावी."

'आपण सर्वजण श्रवणोत्सुक झालां असाल तर सांगतों, ऐका.' असें म्हणून महर्षि जाबालि शुकाची चरित्रकथा सांगूं लागले—

'हा पोपट पूर्वजन्मीं शुकनास प्रधानाचा पुत्र वैशंपायन होता. याच्या उल्लूपणाबद्दल महाश्वेतेनें याला शाप दिला. त्याच्या प्रभावानें हा पक्ष्याच्या योनींत जन्म पावला. तसेंच पूर्वीं चंद्राच्या शापानें श्वेतकेतूंचा पुत्र पुंडरीक देवलोकापासून भ्रष्ट होऊन वैशंपायन या नांवानें मनुष्यलोकीं जन्माला आला होता. अर्थात् पुंडरीक व वैशंपायन हे एकच होत, हें तुमच्या ध्यानांत आलें असेलच.' इत्यादि रोमहर्षण व अद्भुत कथानक महर्षींनीं सुरस व रसाळ वाणीनें वर्णिलें. श्रोतृवृंदाची एकतानता झाली. एखादा झोपीं गेलेला माणूस जागा झाला म्हणजे त्याला जशा स्वप्नांतल्या गोष्टी आठवाव्या त्याप्रमाणें महर्षि बोलत असतां, शुकाला आपल्या पूर्वजन्मींचें स्मरण होऊं लागलें. [2]साधूंचें नुसतें नामस्मरण देखील पुण्यकारक असतें, मग प्रत्यक्ष

---

१ कारणगुणभाञ्ज्येव कार्याणि दृश्यन्ते ।

२ पुण्यानि हि नामग्रहणानि मुनीनां किं पुनर्दर्शनानि ।

दर्शनानें काय काय होणार नाहीं? शुकाला मनुष्याची वाचा फुटली व सर्व विद्या त्याच्या जिव्हाग्रीं स्फुरण पावूं लागल्या. किंबहुना मनुष्याचें शरीरच काय तें कमी होतें; बाकी चंद्रापीडाविषयींचा स्नेह तसाच महाश्वेतेविषयींचा अनुराग हे दोन्ही त्याच्या हृदयांत पूर्ववत् उद्भूत झाले; तसेंच पूर्वजन्मींच्या सर्व गोष्टी आठवून आईबाप, तारापीड, विलासवती आणि जन्मान्तरांतला मित्र कपिंजल यांना भेटण्याचीहि त्याला अनावर इच्छा झाली. महर्षींच्या मुखानें आणखी कित्येक गोष्टींचा खुलासा करून घ्यावा असें त्याच्या मनांत आलें. पण महर्षींच्या डोळ्याशीं डोळा भिडविण्याचें त्याला मनोधैर्य होईना. पूर्वजन्मींच्या दुर्वासनांबद्दल लज्जा वाटून सप्तपाताळांत जाऊन दडूं कीं आकाशांत उडून जाऊं असें त्याला झालें. फार काय, मेल्यापेक्षांहि मेलों असें त्याला होऊन गेलें. शेवटीं एकदाचा मनाचा धडा करून त्यानें महर्षींना विनयपूर्वक प्रार्थना केली कीं, ' भगवन्, आपल्या प्रसादानें मला सर्व ज्ञान प्राप्त झाले व आप्तबांधवांची आठवण झाली, याचा मला परमानद होत आहे. मी अज्ञानांधकारांत असतां मला त्यांच्याविषयीं यत्किंचितहि व्यथा जाणवली नाहीं, पण आतां प्रियसुहृद् चंद्रापीडाच्या विरहानें माझें हृदय शतधा भग्न होत आहे. यास्तव त्याचा जन्म कोठें झाला आहे हें सांगण्याचा मजवर अनुग्रह करावा, म्हणजे त्या स्थळीं जाऊन मी त्याच्या सहवासांत या योनींतहि दुःखांत सुख मानून आनंदानें काळ घालवीन'.

हें ऐकून सरोष पण स्निग्ध दृष्टीनें त्याच्याकडे अवलोकन करीत महर्षि म्हणाले, ' मूढा, पूर्वजन्मींचा तुझा उच्छृंखलपणा या जन्मींहि कायम आहे. अरे, पंख फुटून तूं हिंडूं फिरूं तर लाग व मग काय तें विचार; मूढा, तुझी ही दुर्दशा झाली ती उतावीळपणामुळें,आत्मसंयमनाच्या अभावामुळें व मनोदौर्बल्यामुळें होय.' यावर शुक काय बोलणार! तो खजिल होऊन स्तब्ध बसला.

कथा संपल्यावर हारीतानें एक शंका काढली. त्यानें विचारलें, 'बाबा, हा अमरलोकीं उत्पन्न झाला असतां ह्याला अल्पायुष्य कसें प्राप्त झालें? पक्षियोनींत जन्म येण्याइतकी याची अधोगति कशी झाली? याचा मला अचंबा वाटतो.'

महर्षींनीं उत्तर दिलें, 'इंद्रियनिग्रह करतां न आल्यामुळेंच हा पोपटाच्या जन्माला आला. मात्र शापाचा अवधि संपल्यावर हा दीर्घायुषी होईल.'

हें ऐकतांच शुकाला राहवेना. त्यानें चटकन् करुणस्वरानें विनंती केली, 'भगवन्, पुढच्या जन्मीं मला दीर्घायुष्य कोणत्या उपायानें प्राप्त होईल एवढें मला कळेल तर आपण सांगाल त्याप्रमाणें मी वागेन.' 'हेंहि यथावकाश जसजसें घडून येईल तसतसें तुला कळेल. पुरे आतां ही कथा.' असें म्हणून ते आसनावरून उठून नित्य-कर्माला लागले. गुरूला उत्थापन देण्याचेंहि श्रोतृवृंदाला भान राहिलें नाहीं, इतकी ती तपस्वी मंडळी कथारसानें मोहित झाली होती. ती रोमहर्षित होऊन अजून जशी कांहीं कथाच ऐकत आहे अशी एकाग्रतेनें बसली होती. ते सर्वजण वैराग्यसंपन्न होते तरी यांच्या मुद्रेवर आश्चर्य, शोक व हर्ष इत्यादि मनोविकारांच्या छटा स्पष्ट दिसत होत्या.

## प्रकरण ३१ वें

## शुक व कपिंजल

हारीतानें शुकाला आपल्या पर्णशाळेंत नेऊन ठेविलें. तेंव्हां 'आतां मी तिर्यग्योनींतून कसा व केंव्हां मुक्त होईन? पूर्वजन्मींच्या स्नेह्याचें समागमसुख कसें मिळेल? तें न मिळेल तर जिवंत राहून तरी काय उपयोग? [1]अनेक जन्मीं सहस्रावधि पुण्यकृत्यें करावीं तेंव्हां कोठें नरजन्म प्राप्त होतो, त्यांत ब्राह्मणजन्म दुर्लभ, त्यांत मुनीच्या पोटीं जन्माला येऊन ईशकृपेनें मला देवलोकीं राहावयास मिळालें, या सर्व गोष्टी अनुकूल असून मी आपल्या हातानेंच आपल्या पायावर धोंडा पाडून घेतला! आतां शोक करून काय उपयोग?' असे अनेकविध कल्पनातरंग शुकाच्या मनांत घोळूं लागले. आतां या देहाचाच त्याग करावा, असें मनांत आणून तो जीव देण्याचा विचार करूं लागला.

इतक्यांत हारीत हंसत हंसत येऊन म्हणाला, 'वैशंपायना, तुझें भाग्य थोर आहे. भगवान श्वेतकेतूंकडून कपिंजल येथें आला आहे.'

हें ऐकतांच शुकाच्या जिवांत जीव आला. त्याला पंख फुटल्यासारखें वाटून 'मी कपिंजलाकडे उडूनच जात आहें' असा त्याला आभास झाला. 'कुठें आहे तो?' अशी पृच्छा करून तो उंच मान करून निरखून पाहूं लागला; आणि मित्रदर्शन होतांच त्याच्या डोळ्यांतून घळघळां पाणी वाहूं लागले! तो मुक्तकंठानें रडूं लागला. कपिंजलानें त्याला दोन्ही हातांनीं उचलून उराशीं घट्ट धरलें व तोहि शुकाच्या पाठीवरून हात फिरवून त्याजवर टिपें गाळूं लागला. मित्रद्वय गहिंवरून गेलें!

शुकानें स्फुंदत स्फुंदत विचारलें, 'कपिंजला, माझे वडील

---

१ अनेकभवसुकृतसहस्राधिगम्यं मानुष्यम्।

खुशाल आहेत ना ? ते माझ्यावर कोपले आहेत काय ?' कपिंजलानें उत्तर दिलें, 'तुझे वडील खुशाल आहेत. त्यांनीं अंतर्ज्ञानानें तुझी हकीकत जाणून पातकाचें निराकरण करण्याकरितां अनुष्ठान आरंभिलें आहे. तें समाप्त होईपर्यंत तूं जाबालींच्याच आश्रमीं राहावेंस अशी त्यांची तुला आज्ञा आहे. तुझी माता लक्ष्मी हिचेंहि हेंच सांगणें आहे. मित्रा, श्वेतकेतूंनीं केलेल्या अनुष्ठानाच्या प्रभावानें मी जसा अश्वयोनींतून मुक्त झालों तसा तूंहि अल्पावधींतच मुक्त होशील असा माझा तर्क आहे.'

शुक म्हणाला, 'मित्रा, मी किती कृतघ्न आहें ! स्नेह्याकरितां तुझा केवढा हा स्वार्थत्याग ! माझ्यासाठीं तुला पुण्यवानाला पशुकोटींत जन्मास जावें लागलें ! सोमपान करणाऱ्या तुझ्या पवित्र मुखांत लोखंडी लगाम येऊन अडकला ! पल्लवशय्येवर लोळणाऱ्या तुझ्या कोंवळ्या पाठीवर खोगीर येऊन बसलें. यज्ञोपवीत धारण करणाऱ्या तुझ्या अंगावर वादीचे वळ उठले !' अशा प्रकारचे स्नेहपूर्ण उद्गार काढीत असतां शुकाला पक्षिजातीचेंहि भान राहिलें नाहीं. इतका तो मित्राशीं तन्मय होऊन गेला. त्याला कुरवाळीत कपिंजल म्हणाला, 'श्वेतकेतूंनीं मजकडे एक काम सोपविलें आहे तें पार पाडण्याला मला आतां गेलें पाहिजे. तूं कांहीं चिंता बाळगूं नकोस.' असें आश्वासन देऊन कपिंजल भुर्‌दिशीं सुरलोकांत उडून गेला.

## प्रकरण ३२ वें

# चांडालकन्यका

हारीतानें शुकरूपी वैशंपायनाला जीव लावून वाढविलें. त्याला पंख फुटून थोडेंसें उडतां येऊं लागलें. तेव्हां त्याच्या मनांत आलें कीं, चंद्रापीडाचा पुनर्जन्म कोठें झाला आहे याचें जरी मला ज्ञान नाहीं तरी पण महाश्वेता तीच आहे; तेव्हां तिच्याकडेच जाऊन राहावें हें बरें. असा मनाचा पक्का निर्धार करून तो सहल करण्याच्या निमित्तानें बाहेर पडला असतां उत्तर दिशेकडे उड्डाण करीत चालला. पण त्याला उडण्याचा फारसा सराव नसल्यानें थोडक्याच वेळांत तो थकला आणि एका झाडावर जाऊन बसला. तेथें त्याला गाढ झोप लागली. जागा झाल्यावर त्याला असें आढळून आलें कीं, आपण जाळ्यांत अडकलों असून पुढें एक भयंकर पुरुष उभा आहे. त्या पुरुषाच्या अंगावरील वस्त्र जितकें काळें होते तितकाच त्याचा वर्णहि काळा होता. त्याचे केश व अंतःकरण दोन्हीं स्नेहशून्य होतीं. हा साक्षात् काळपुरुषच आहे असें शुकाला वाटून तो स्वतःच्या जीविताविषयीं निराश झाला व त्याला म्हणाला, 'भल्या माणसा, माझा कांहीं अपराध नसतां तूं मला कां धरलेंस ? केवळ मौजेखातर पकडलें असशील तर तुझें कौतुक पुरे झालें. मला आतां सोडून दे. मला प्रियजनांच्या भेटीला दूर जावयाचें आहे. माझें मांस खाण्याची तुला इच्छा असेल तर मी निद्रित असतांनाच मला तूं मारून कां टाकलें नाहींस ?' त्या पुरुषानें उत्तर दिलें, 'महाशया, मी जातीचा निर्दय चांडाळ आहें. मी तुला गंमतीनेंहि धरलें नाहीं व मांसाच्या लोभानें नाहींच नाहीं. माझा धनी, चांडाळांचा स्वामी, येथें जवळच राहातो. त्याला एक मुलगी आहे. तिला अशी बातमी लागली आहे कीं, जाबालींच्या आश्रमांत माणसासारखा बोलका व गुणी राघू

आहे. म्हणून त्याला पकडण्याकरितां मजसारखे पुष्कळ लोक तिनें आसमंतात् धाडिले आहेत. बा शुका, मी दैववान म्हणूनच तूं माझ्या जाळ्यांत सांपडलास! आतां मी तुला तिजकडे नेतों. ती तुझें वाटेल तें करो, सोडो अगर ठेवो.'

हें ऐकून शुक आपल्याशींच म्हणाला, 'हाय, हाय! दुरात्म्या पुंडरीका, काय हा तुझ्या कर्माचा भयंकर परिणाम! धिक्कार असो तुला! देवलोकीं वास्तव्य करणाऱ्या तुला चांडाळवस्तींत दिवस काढावे लागणार! चांडाळाचें अन्न तुला खावें लागून त्याच्या मुलीचें तूं खेळणें होऊन राहाणार! मना, आतां दगडासारखा कठीण हो. हे ताता, माझें या नरकापासून रक्षण करा; सख्या कपिंजला, धाव रे धाव!' असे हजारो विचार त्याच्या मनांत येऊन तो बापुडवाण्या मुद्रेनें चांडालाला म्हणाला, 'मी पूर्वजन्मींचा मुनि आहें, मला जीवदान दिलेंस तर तुला मोठें पुण्य लागेल. अद्याप कोणीं पाहिलें नाहीं तोंवर मला सोडून देण्याला तुला काय हरकत आहे?'

चांडाळानें खदखदां हसून उत्तर केलें, 'वेड्या, सर्वसाक्षी परमेश्वर चांगलें वाईट कर्म पाहात नाहीं काय? असलें खोटें काम करून मी आपल्या मालकाला फसवूं काय? त्याची आज्ञा मला प्रमाण आहे.' असें बोलत बोलत चांडाळ शुकाला घेऊन त्वरेनें जाऊं लागला.

चांडालवस्तींत जिकडे तिकडे हाडांचा ढीग पडला असून घाणेरड्या धुराची दुर्गंधी सुटली होती. रक्तमांसाचा चिखल झाला होता. ह्या गलिच्छ व ओंगळ प्रदेशाचें निरीक्षण करून शुकाला वाटलें कीं, 'सर्व स्मशानांचा हा समूहच आहे, कीं हें पापाचें माहेरघर आहे? येथील लोक त्यांच्या घाणेरड्या कर्मापेक्षां अधिक मलिन आहेत व त्याहून त्यांचें हृदय अधिकच अमंगल आहे. अरेरे, मी येथें कसा

राहूं ? आपल्या जातीवर न जातां, चांडालकन्या माझ्यावर दया करून मला सोडून देईल काय ?'

अशा प्रकारें तो आपल्याशींच पुटपुटत आहे तोंच चांडाळाचीं मुलें पिंजरा घेऊन तेथें आलीं. तेव्हां चांडाळकन्येला अत्यानंद होऊन ती म्हणाली, ' अरे कारट्या, बरा सांपडलास. आतां कुठं जातोस बघतें. तुझा स्वैराचार पार काढून टाकतें. ' असें म्हणून तिनें शुकाला पिंजऱ्यांत घालून दार लावून घेतलें; त्याबरोबर आपल्या आशेचेंहि द्वार कायमचें बंद झालें, असें समजून शुक मौन धरून बसला. ' माझा मधुर भाषणाचा गुण दोषरूप होऊन माझ्या बंधनाला कारणीभूत झाला ! इंद्रियें स्वाधीन न राहिल्यामुळेंच ही शोचनीय स्थिति मला प्राप्त झाली. आतां वाणीचेंच काय पण इतर इंद्रियांचेहि पण संयमन करितों. आतां काय वाटेल तें होवो, मी चकार शब्द म्हणून बोलणार नाहीं, अन्नाला देखील शिवणार नाहीं, म्हणजे तरी मला कंटाळून सोडून देतील ' अशी त्यानें मनाशीं दृढ प्रतिज्ञा केली.

शुकानें बोलावें म्हणून चांडालकन्येनें हरप्रयत्न केले. त्याला आंजारून गोंजारून पाहिलें, धाकदपटशा दाखविला व अखेरीस या पक्षिरत्नावर चौदाव्या रत्नाचाहि प्रयोग करून पाहिला. पण शुकाचा निश्चय बिलकूल ढळला नाहीं. तो फक्त ' चीं ची ' करी. दुसऱ्या दिवशीं चांडाळकन्येनें त्याच्यापुढें कच्चीं व पिकलेलीं विविध फळें आणून ठेविलीं, तथापि त्यांलाहि तो स्पर्श करीना; तेव्हां ती ममतेनें म्हणाली—

"शुका, उगीच कां तहानभूक मारून आपल्या जिवाला कष्टवितोस ? पशुपक्ष्याला कसला भक्ष्याभक्ष्यविचार ? तुला पूर्वजातीचें स्मरण होत आहे काय ? त्या जातींत तूं आपलें मन स्वाधीन ठेवलें नाहींस म्हणून तुला ही योनी प्राप्त झाली. आतां या हीन जातीस

योग्य असें आचरण ठवण्योंत दोष कोणता ? 'भक्ष्याभक्ष्याचे कडक नियम पाळणारांना सुद्धां विपत्काळीं अभक्ष्यावर जीव जगवावा लागतो, समजलास ? शिवाय फळें तर सर्वांनाच चालतात. मग खाईनास एक अर्धे ! "

अशा आशयाचें सशास्त्र व चांडाळजातीला दुर्लभ असें तिचें भाषण ऐकून शुकानें आपला निग्रह सोडून केवळ प्राणधारणापुरतीं फळें भक्षण केलीं, पण मौनव्रताचा मुळींच त्याग केला नाहीं.

---

## प्रकरण ३३ वें

# राजा शूद्रक

याप्रमाणें कांहीं दिवस लोटल्यावर एकाएकीं त्या शुकाच्या लाकडी पिंजऱ्याचें रूपान्तर सोन्याच्या पिंजऱ्यांत झालें. चांडाळाचें गांव देवनगरीसारखें दिसूं लागलें. हा काय चमत्कार आहे ? माझ्या दृष्टीला भुरळ तर पडली नाहींना ? हें काय गौडबंगाल आहे ? हें कळण्याची इच्छा शुकाच्या पोटांत मावेनाशी झाली. त्याच्या ओठांपयत शब्द आले. इतक्यांत चांडाळकन्यका तेथें आली आणि तो पिंजरा घेऊन तिनें मालवदेशाच्या राजधानीला प्रयाण केलें.

मालवदेशाची राजधानी विदिशा. ती वेत्रवती नदीनें वेष्टिलेली होती. त्या ठिकाणीं शूद्रक नामक बलाढ्य सम्राट राज्य करीत होता. तो भूलोकचा इंद्रच आहे असें लोकांस वाटे. त्याच्या राज्यांत प्रजेला शोकाचे व दुःखाचे प्रसंग विरळा, नव्हे मुळींच नव्हते, अस

---

१ येषां च भक्ष्याभक्ष्यनियमोऽस्ति तेषामप्यापत्काले प्राणानां संधारणमभक्ष्योपयोगेनापि तावद्विहितम्।

म्हटलें तरी चालेल. होमाच्या धुरानेंच काय अश्रुपात होईल तेव-ढाच! घोड्यांनाच काय ते चाबकाचे फटके बसत. विवाहाच्या वेळींच काय तें करग्रहण होत असे. सोंगट्यांच्या व बुद्धिबळांच्या पटांतील मात्र घरें रिकामीं पडत! अशा प्रकारचें राज्य दुसरें रामराज्यच होय अशी प्रजाजनांची भावना होती.

एके दिवशीं शूद्रक राजा आपल्या सभामंडपांत बसला असतां द्वारपालिकेनें तेथें येऊन अशी वर्दी दिली कीं, 'महाराज, दक्षिण देशांतील कोणी एक चांडालकन्यका पिंजऱ्यांत एक पोपट घेऊन बाहेर आली आहे. तिची अशी विनंती आहे कीं, रत्नाकराप्रमाणें आपल्याजवळ सर्व प्रकारच्या रत्नांचा संग्रह आहे आणि हा पोपट एक रत्नच आहे; म्हणून तो आपल्या चरणीं अर्पण करण्याकरितां मी आलें आहे. मला भेट मिळावी.'

शूद्रक म्हणाला, 'बरें आहे, जा, तिला आंत घेऊन ये. आंत आली म्हणून काय झालें?'

'जशी आपली आज्ञा' असें म्हणून द्वारपालिका बाहेर जाऊन त्या चांडाळकन्येला आंत घेऊन आली.

शूद्रक राजाच्या कंठांतील इंद्रनीलादि विविध रत्नांची प्रभा चोहों-कडे फांकल्यानें त्याच्या भोंवतीं सदा सर्वकाळ इंद्रधनुष्य पडल्यासारखें दिसत असे; पण त्या वेळीं चांडालकन्येच्या पुढें राजाचें तेज फिकें पडलें. तो विस्मयानें आपल्या मनांत म्हणतो, '[1]ब्रह्मदेवाला धिक्कार असो! कोण हा त्याचा वेडेपणा! त्यानें भलत्याच ठिकाणीं असें अप्रतिम लावण्य निर्माण केलें! समुद्रमंथनाच्या वेळीं अमृतहरण करण्याकरितां विष्णूनें जें रूप घेतलें तें हें कीं काय?'

असे विचार राजाच्या मनांत चालू आहेत, तोंच चांडालकन्येच्या

---

१ धिग्विधातारमसदृशसंयोगकारिणम् ।

बरोबरचा म्हातारा माणूस राजाच्या पुढें पिंजरा ठेवून हात जोडून म्हणतो—

'महाराज, हा पोपट अनेक शास्त्रें व विविध कला यांत पारंगत असून सर्व भाषा जाणतो. याचें नांव वैशंपायन. आमच्या धन्याची कन्या आपल्या चरणीं हें रत्न सादर करण्याला आली आहे. आपण सर्व रत्नांचे उपभोक्ते आहांत. तरी भूतलावर दुर्लभ अशा या रत्नाचा आपण स्वीकार करावा.'

म्हातारा मागें सरकल्यावर पोपटाने उजवा पाय उचलून स्पष्ट वाणीनें राजाचा जयघोष केला. राजाविषयीं लोकोत्तरवर्णनपर एक आर्या त्यानें म्हटली; तेव्हां शूद्रक थक्क होऊन गेला ! त्याला सानंद आश्चर्य वाटलें. 'अहाहा वाणी किती मधुर! भाषण किती मोहक! हा काय चमत्कार आहे!' असें राजा स्वतःशीं पुटपुटला आणि शुकाला म्हणाला, 'शुका, तूं कोठें होतास? चांडाळाच्य हातीं कसा लागलास? तुझे आईबाप कोण? तुला इतकें ज्ञान कसें प्राप्त झालें? ज्ञानी असून तुला पक्षियोनी कशी प्राप्त झाली? इत्यादि सर्व हकीकत सांग.' शुकानें होकारार्थीं मान हलविली व म्हटलें, 'माझी जन्मकथा फारच मोठी आहे; तथापि आपणाला ऐकण्याची प्रबळ इच्छा झाली आहे म्हणूनच सांगतों.' असें हलक्या स्वरांत बोलून त्यानें आपल्या दोन्ही जन्मांची हकीकत इत्थंभूत वर्णन केली व सरतेशेवटीं तो म्हणाला, 'ही चांडाळकन्या कोण, हिनें मला धरून आपणांकडे कां आणलें या गोष्टी मात्र मला महाराजांप्रमाणेंच गूढ आहेत.' त्यावर 'तर मग ही गोष्ट मातंगकन्येलाच विचारली पाहिजे' असें म्हणून शूद्रकानें ताबडतोब तिला बोलावून आणिलें. ती लवून प्रणाम करून म्हणाली—

'हे राजा, तूं तारकांमध्यें रममाण होणारा रोहिणीपति चंद्रमा असून कादंबरीच्या जिवाचा कलिजा आहेस. पूर्वीं तूं चंद्रापीड

म्हणून प्रथम जन्म घेतलास व आतां 'शूद्रक'रूपानें येथें विराजमान झाला आहेस. तूं या पोपटाची गोष्ट ऐकलीस व त्याबरोबर आपलाहि पूर्वजन्मींचा वृत्तान्त श्रवण केलास. या शुकरूप पुंडरीकाची आई मी लक्ष्मी. हा शुक पित्याची आज्ञा उल्लंघून जाबालींच्या आश्रमांतून उडून आपल्या प्रियेस भेटण्याला जाऊं लागला तेव्हां श्वेतकेतूंनीं त दिव्य दृष्टीनें पाहून मला सांगितलें कीं,

"[1]दुराचरणी प्राण्याच्या नेत्रांत पश्चात्तापाचें अंजन घातल्याशिवाय तो शुद्धीवर येत नाहीं. हा तुझा पुत्र पुंडरीक घसरत घसरत पक्षिजातीपेक्षांहि नीच योनींत जात आहे; यास्तव मी आरंभिलेलें हें कार्य सिद्धीस जाईपर्यंत याला मनुष्यलोकीं धरून ठेव." 'श्वेतकेतूंच्या आज्ञेनुसार पुत्राला वठणीवर आणण्याकरितां, मी चांडाळमाया निर्माण केली आणि स्वतः चांडाळकन्या होऊन हा सर्व प्रकार घडवून आणिला. चांडाळ जात मी पसंत केली याचें कारण याला कोणाचाहि संपर्क लागूं नये आणि पूर्ण अनुताप तर व्हावा. असो. श्वेतकेतूंचें अनुष्ठान आतां समाप्त झालें असून तुम्हां दोघांचा शापमुक्त होण्याचा काल समीप आला आहे हें जाणून मी याला तुझ्याजवळ आणिलें. तुमचें सांप्रतचें शरीर हें जन्म, मृत्यु, जरा व व्याधि इत्यादि दुःखांनीं युक्त आहे; तरी त्याचा त्याग करा आणि आपआपलीं पूर्वस्वरूपें धारण करून इष्टजनसमागमांत चिरकाल सुखांचा अनुभव घ्या.' असें बोलतां बोलतां लक्ष्मी अकस्मात् स्वर्गलोकीं निघून गेली. तिच्या भूषणांचा रुणझुण आवाज किती तरी वेळ ऐकूं येत होता! सर्व लोक विस्मयानें वर मान करून पाहात राहिले!!

---

१ सर्व एव ह्यविनयप्रवृत्तोऽनुतापाद्विना न निवर्तते।

## प्रकरण ३४ वें
# आनंदीआनंद

लक्ष्मीनें सांगितलेल्या गोष्टीवरून शूद्रकाला पूर्वजन्मींची आठवण झाली व 'हाय! हाय! प्रिये कादंबरी, माझ्यासाठीं तुझी काय अवस्था झाली असेल!' असे शोकोद्गार काढून तो कादंबरीविरहानें व्याकुळ होऊं लागला. त्याचीं गात्रें काष्ठतुल्य जड झालीं. वदन निस्तेज झालें! प्राणवायु देहास सोडून गेला! महाश्वेतेच्या विरहवेदनेनें वैशंपायनाचीहि तशीच अवस्था झाली.

इकडे हा प्रकार चालला असतां तिकडे कादंबरी चंद्रापीडाच्या देहाचें रात्रंदिवस रक्षण करीत काळ कंठीत होती. याच सुमारास एकदां तिनें आपल्या प्राणवल्लभास सुगंधित द्रव्य लावून स्नान घातलें. सर्वांगास उटी लावून गळ्यांत पुष्पहार घातला. तों काय आश्चर्य! कादंबरीच्या अमृतमय स्पर्शानें चंद्रापीड झोपेंतून उठल्यासारखा जागृत होऊन उभा राहिला! कादंबरी सानंद भीतीनें किंचित् मागें सरकली. तेव्हां चंद्रापीड सुप्रसन्न व उत्सुक नेत्रांनीं तिच्याकडे पाहात म्हणाला, "प्रिये कादंबरि, तुझा पूर्वपरिचित जो चंद्रापीड तोच मी आहें. मग भीतीनें अशी दूर दूर कां जातेस? तुझ्या करस्पर्शानेंच मी जिवंत झालों. तूं अमृतापासून उत्पन्न झालेल्या अप्सरांच्या कुळांत निर्माण झालीस याचें तुला विस्मरण झालें काय? इतके दिवस मी तुझ्या स्पर्शानें सजीव झालों नाहीं याचें कारण शापाचा प्रभाव. आज माझा शाप दूर होऊन मी शूद्रकदेहाचा आतांच परित्याग केला. महाश्वेतेचा प्रियकर जो पुंडरीक त्याचा शापहि मजबरोबरच संपला आहे. हा बघ तो पुंडरीक कपिंजलाच्या खांद्यावर हात टाकून चंद्रलोकांतून उतरून इकडेच येत आहे. ' अगबाई खरेंच. तर मी ही सुवार्ता महाश्वेतेला जाऊन सांगतें.' असें म्हणून कादंबरी महाश्वेतेकडे धावत गेली.

चित्ररथ गंधर्वाला ही आनंदाची बातमी कळविण्याकरितां केयूरक हेमकूट पर्वतावर गेला आणि तारापीडाच्या आश्रमाकडे मदलेखा लगबगीनें धावत गेली.

पुंडरीक आकाशांतून उतरतांच चंद्रापीड त्याला आलिंगन देऊन म्हणाला, "सख्या, पूर्वसंबंधानें पाहिलें तर तूं माझा जांवई आहेस. पण या जन्मीं तुझा माझा स्नेह जमला आहे यास्तव तूं माझ्याशीं याच नात्यानें वागावें."

इतक्यांत 'तो कोठें आहे? कोठें आहे माझा वत्स' असें मोठ्यानें विचारीत विचारीत तारापीड सर्व परिवारासह तेथें आला. महाश्वेतेचे मातापितरहि त्या ठिकाणीं येऊन दाखल झाले. तेव्हां सर्वजण गहिंवरून गेले. त्यांच्या आनंदास पारावार उरला नाहीं. तारापीड व शुकनास यांनीं आपआपल्या भावी व्याह्यांचें प्रेमपुरःसर स्वागत केलें.

मग तारापीडाच्या इच्छेवरून सर्व मंडळी हेमकूट पर्वतावर गेली. तेथें चंद्रापीडाचें कादंबरीशीं व पुंडरीकाचें महाश्वेतेशीं मोठ्या थाटानें विधिपूर्वक लग्न लागलें. वरदक्षिणा म्हणून चित्ररथानें आपलें सगळें राज्य जांवयास आंदण दिलें. हंसानेंहि महाश्वेतेसह आपलें राज्य पुंडरीकाला देऊन टाकलें. तथापि उभयतां वरांनीं राज्यांचा स्वीकार केला नाहीं; आपणांस अनुरूप व प्रिय अशा वधूंचाच मात्र अंगीकार केला. ह्या अभीष्ट प्राप्तींतच त्यांना कृतार्थता वाटली.

गंधर्वनगरींत आनंदाचें साम्राज्य नांदूं लागलें. विवाहमहोत्सव सारखा दहा दिवस चालला होता. तो काल सर्वांनाच एक दिवसाप्रमाणें भासला! या सुखसोहळ्यांत कादंबरीला पत्रलेखेची आठवण झाली. तिनें डोळ्यांत आंसवें आणून चंद्रापीडाला विचारलें, 'आपणां सर्वांची पुनरपि भेट झाली, पण पत्रलेखेची काय वाट झाली हें कांहीं मला समजलें नाहीं.'

चंद्रापीडानें उत्तर दिलें, ' प्रिये, मी मृत्युलोकीं जन्म घेणार असें ऐकून माझ्या सेवेकरितां प्रत्यक्ष रोहिणी पत्रलेखा होऊन आली होती. मी दुसरा जन्म घेतल्यावर फिरून ती मृत्युलोकीं येत होती, परंतु मी नको म्हटल्यामुळें ती चंद्रलोकींच राहिली. आपण तेथें जाऊं तेव्हां तुझी आणि तिची गांठ पडेल.'

नंतर श्वशुराचा निरोप घेऊन चंद्रापीड उज्जयिनीला आला. ज्यांनीं आपणाकरितां हालअपेष्टा भोगिल्या त्या राजेलोकांस व सेवकांस त्यानें संतुष्ट केलें. त्यानें पुंडरीकावर राज्यकारभार सोंपविला आणि कधीं रोहिणीच्या इच्छेवरून चंद्रलोकांत, कधीं श्वशुराच्या आग्रहा-वरून हेमकूटास, कधीं आप्तमित्रांच्या प्रेमानें उज्जयिनींत तर कधीं कधीं पित्याची सेवा करण्याकरितां तारापीडाच्या आश्रमांत, असा तो कादंबरीसह आनंदानें राहूं लागला. तेव्हांपासून चंद्रापीडासह कादंबरी, कादंबरीसह महाश्वेता, महाश्वेतेसह पुंडरीक आणि पुंडरी-कासह चंद्रापीड, परस्परांचा कधींहि वियोग न होतां, चिरकाळ सौख्यानंद अनुभवूं लागलीं.

## टिप्पणी

पृ. ( १ ) १ अच्छोद ( अच्छ + उद ) अच्छ = निर्मळ, उद = पाणी; ज्याचें पाणी स्वच्छ आहे असें. पृ. ( २५ ) कुलूत– सतलजच्या पूर्वेचा व जालंदर दुआबच्या आग्नेयीकडील प्रदेश. पृ. (२६) लक्ष्मीचीं सख्खीं भावंडें—अमृतप्राप्तीकरितां देवांनीं व दानवांनीं जेव्हां समुद्राचें मंथन केलें त्यावेळीं त्यांतून चवदा रत्नें निघालीं तीं हीं:– (१) कालकूट विष– हें शंकरानें प्राशन केलें. (२) लक्ष्मी– विष्णूची भार्या. ( ३ ) कौस्तुभ– विष्णूनें वक्षःस्थळावर धारण केलेला मणी. (४) 'शार्ङ्ग' धनुष्य– विष्णूचें. (५) 'पांचजन्य'– शंख विष्णूचा. ( ६ ) कामधेनु– ही वसिष्ठास मिळाली. (७) उच्चैःश्रवस्– सात तोंडाचा घोडा. हा इंद्रानें घेतला. (८) चंद्र. ( ९ ) मद्य–हें दैत्यांनीं घेतलें. (१०) ऐरावत– या नांवाचा हत्ती. हा इंद्राला मिळाला. (११) पारिजात– एक कल्पवृक्ष. हा देवांनीं नंदनवनांत नेला. (१२) रंभा व इतर अप्सरा. ( १३ ) धन्वंतरि– देवांचा वैद्य. ( १४ ) अमृत– धन्वंतरि अमृताचा कुंभ घेऊनच बाहेर आला. तें विष्णूनें मोहिनीचें रूप घेऊन देवांना वाटलें. मंगळाष्टकांपैकीं खालील पद्यांत चवदा रत्नें गोविलीं आहेत.

> लक्ष्मीः कौस्तुभपारिजातकसुरा धन्वंतरिश्चन्द्रमाः ।
> गावः कामदुघाः सुरेश्वरगजो रंभादिदेवाङ्गनाः ॥
> अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शंखोऽमृतं चांबुधेः ।
> रत्नानीह चतुर्दश प्रतिदिनं कुर्युः सदा मंगलम् ॥

पृ. (३२) ३ किन्नर— (किं नरः—मनुष्य कीं काय ? ) धड मनुष्य नाहीं व धड देव नाहीं अशी मधली कोटी किन्नराला घोड्याचें तोंड असतें, बाकी आकृति मनुष्यासारखी. पृ. (५१) ४ करग्रहण– कर–( १ ) हात. ( २ ) सरकार देणे, खंडणी. (१) चंद्रापीडानें दिशारूपी स्त्रियांचें पाणिग्रहण ( लग्न ) केलें. ( २ ) त्यानें सर्व दिशांतील राज्यांतून खंडणी वसूल केली.